# मंगलभुवन

[ स्वतंत्र सामाजिक गद्यपद्यात्मक नाटक ]



नारायण विनायक कुलकर्णी

प्रकाशक—
विठ्ठल रामचंद्र खाडिलकर
मालक—श्रीदत्त एजन्सी,
बुधवार चौक, पुणें २.

मुद्रक—
गणेश काशिनाथ गोखले
डायरेक्टर—श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स,
४९५–४९६ शनवार पेठ, पुणें २.

1956

## रसिकांचे सेवेसी—

**मंगलभुवन**ची कल्पना, मांडणी, स्वभावपरिपोष इत्यादि सर्व माझी स्वतःची मिळकत आहे; त्यांत कुणाचीही उसनवारी नाहीं. तसेंच नाटकाचा प्रधान हेतु उच्च प्रकारचें सात्विक मनोरंजन एवढाच ठेवला असल्यामुळें माझी ही नवीन वाङ्मयसेवा आपण पूर्वी इतक्याच प्रेमानें गोड करून घ्याल अशी मला खात्री आहे.

**मंगलभुवन** लिहून पुस्तकरूपानें व रंगभूमीवर प्रयोगरूपानें आणीपर्यंत ज्या ज्या माझ्या जिवलग सन्मित्रांचें मला आत्यंतिक सहाय्य झालें आहे, त्या सर्वांचा मी आजीव ऋणी आहें.

२६ आक्टोबर १९३४. **ना. वि. कुलकर्णी**

---

**मंगलभुवन** या नाटकाचा प्रथम प्रयोग कोल्हापूर पॅलेस थिएटरांत 'किर्लोस्कर संगीत मंडळी' नें शुक्रवार ता. २४ ऑगस्ट १९३४ रोजीं रात्रीं केला, त्यांत खालील मंडळींनीं भाग घेतला होता.

| | | |
|---|---|---|
| मधुकर | ... ... | श्री. कृष्णराव कोल्हापुरे. |
| यशवंत | ... ... | श्री. अभ्यंकर. |
| हणमुकाका | ... ... | श्री. यशवंतराव आठवले. |
| गजानन | ... ... | श्री. मुळे. |
| सदु गडी | ... ... | श्री. संत. |
| कमल | ... ... | सौ. गिरिजाबाई केळेकर. |
| मैना | ... ... | कु. विमल कर्नाटकी. |
| सरस्वती | ... ... | श्री. बापट. |
| गंगासानी | ... ... | श्री. पाटील. |
| तुळसाबाई | ... | श्री. परांजपे. |

| | | |
|---|---|---|
| प्रोड्यूसर | ... ... | श्री. कृष्णराव कोल्हापुरे. |
| डायरेक्टर | ... ... | श्री. यशवंतराव आठवले. |
| मॅनेजर | ... ... | श्री. दादासाहेब परचुरे. |
| फोटो आर्टिस्ट | ... | श्री. अष्टेकर (कोल्हापुर).<br>श्री. घारपुरे (सांगली) |
| ब्लॉक मेकर | ... ... | श्री. पोतनीस (पुणें). |

——

मंगलभुवन' नाटकाचे निःसीम पुरस्कर्ते.



ग. का. परचुरे. (ज. मॅ. कि. सं. मं.) — ना. वि. कुलकर्णी. (नाटककार) — कृ. सा. कोल्हापुरे. (मालक–कि. सं. मं.) — नटश्रेष्ठ गणपतराव बोडस. (प्रमुख नाट्य दिग्दर्शक)

श्रीराम

# मंगलभुवन

## अंक १ ला

——:०:——

मंगलाचरण

**नमन तुज शंभो। असो नित उमाकांता॥ करीं धरुनि दावीं सुमार्ग॥ ध्रु०॥ प्रेम नव लीला–केलि–विलोल। करितां रमत; ठेविं वरद कर माथां॥१॥**

### प्रवेश १ ला

(**गजाननरावांचें घर.** गजाननराव बसले आहेत. मधुकर बाहेरून येतो.)

**मधुकर**—गजानना! गजानना!! अरे गजाभाऊ!

**गजानन**—मधू, ये बैस. काय म्हणत होतास?

**मधुकर**—गजाभाऊ, तुम्हांला माझ्या प्रीतीविवाहाची कल्पना पसंत पडली, तुम्ही मला प्रोत्साहन दिलेंत आणि आमचें मंगलकार्य सिद्धीस नेण्याची सर्व जबाबदारी तुम्ही आपल्या शिरावर घेतलीत याबद्दल—

**गजानन**—त्याबद्दल काय? माझे आभार मानणार? अरे ‘सजयति सिंधुरवदनो देवो यत्पादपंकज स्मरणम्’ वगैरे म्हटलें म्हणजे प्रत्यक्ष गजाननालासुद्धां मंगलकार्यांत यावें लागतें मग तितक्याच प्रेमानें तुमच्यासारख्या मित्रांनीं या तुमच्या गजानन देवाला आवाहन केल्यानंतर सर्वतोपरी मदत करून मित्राच्या मंगलकार्याची सांगता करायला मला हजर असणें—नव्हे सहकुटुंब हजर असणें—भागच आहे! मी तर म्हणतों

तें माझें कर्तव्यच आहे ! बाकी मधू, सामाजिक सुधारणेच्या बाबतींत सक्रिय साहस करायला तूं पुढें सरसावलास—

**मधुकर**—पण केवळ प्रेमाच्या जोरावर !

**शरणागति प्रेमास घडतां मम तीच करि काजा ॥ ध्रु० ॥**
**मार्ग असा हा माझा, सीधा ताजा, मदनशर मना राजा ॥१॥**

**गजानन**—कां होईना. केवळ प्रेमाच्या जोरावर ! पण तुझ्या हातून सामाजिक सुधारणेला प्रत्यक्ष हातभार लागतो आहे. बस्स तर ! आणि याकरतां तुझें स्वागत मला केलेंच पाहिजे. स्वागताप्रीत्यर्थ प्रथम तुला चहा देऊन तुझी चहा करणें अवश्य आहे. सरू, सरूताई, ( सरस्वति दोन हातांत दोन चहाचें कप घेऊन येते. )

**सरस्वती**—चहा घेऊन ही तयार आहे !

**मधुकर**—अरे वाः ! वहिनी, तुम्ही अगदीं कमालच केलीत ! मी आल्याचें तुम्हांला कसें कळलें !

**सरस्वती**—कळलं आपलं असंच ! मधुकर, हं, हा स्वागताचा चहा घ्या बरं अगोदर ! माझ्या मैत्रिणीला–कमलला–तुम्हीं वचन दिलंत, तुमचा वाङ्‌निश्चय झाला, त्याचा हा चहा बरं का !

**गजानन**—हेंही कळलं कां सरूताई तुम्हाला !

**सरस्वती**—सरूताई काय म्हणायचें तें ! लोक काय म्हणतील !

**गजानन**—झक् मारतात लोक ! बायको म्हणजे बायकोच कांहीं बारान्‌बारा चोवीस तास असत नाहीं नवऱ्याची. सुखाच्या वेळीं सखी, सुविचार विनिमयाच्या वेळीं सल्लागार आणि जेवायला घालतांना आई—

**मधुकर**—मग या वेळीं वहिनी तुझ्या आई का !

**गजानन**—तसं म्हणायला तरी काय हरकत आहे ! ज्या आस्थेनें आई मुलाला खायला आणते, त्याच आस्थेनें यावेळीं तिनं आपल्याला चहा आणला आहे ना ! मग झालं तर ! खरोखर मधुकरा, तुला सांगतों, आमच्यासारखे आम्हींच सुखी आहोंत. एखाद्याला वैवाहिक सौख्य लाभावं तर असं आमच्यासारखं ! मी चुकलों, तर ही मला सावरते, हिच्या हातून अपराध घडला तर मी विसरून जातों. मी तर म्हणतों नवीन

वधुवरांनीं सुखी कसं व्हावं, याला आदर्श म्हणून आम्हांला पुढें ठेवावं कां खरं कीं नाहीं सरूताई— ( सरस्वती हंसते. )

**मधुकर**—मग मी तुझाच आदर्श ठेवला आहे ना माझ्यासमोर ?

**गजानन**—आणि कमलाताईनें ?

**मधुकर**—या वहिनींचा !

**गजानन**—मग खास तुम्ही आमच्यासारखेच सुखी होणार !

**सरस्वती**—तें कां ? आमच्यापेक्षां सुद्धां जास्त ! मधुकर कोकणस्थ आणि कमला कऱ्हाडे यांचा सुरेख संगम घडला म्हणून वर्तमानपत्रांतून यांचे फोटो येतील, चौंहीकडून यांचें अभिनंदन होईल, त्या सौख्याचा लाभ आमच्यापेक्षां यांना नाहीं कां जास्त होणार ? यांची सर आम्हांला कशाला येणार ?

**गजानन**—रास्त आहे तुझं बोलणं. मधुकरा, ह्या श्रेष्ठ सुखाला आम्ही मुकलों आहोंत खरें. मी कऱ्हाडा–ही पण कऱ्हाड्याचीच–जाऊं दे. तुझ्या लग्नसमारंभांत प्रामुख्यानं पुढाकार घेऊन आम्हीं त्या सौख्याची उणीव अंशतः भरून काढूं. पण बोलायच्या भरांत मधुकर, आपला चहा तसाच निऊन चालला आहे ना ?

**मधुकर**—वहिनी, तुम्हीं नाहीं कां चहा घेत आमच्याबरोबर ?

**सरस्वती**—तुम्हीं घ्या. मी आंत घेतें ना कमलाताईबरोबर—

**गजानन**—काय ? कमलाताई आली आहे ! मग आंत कां ? तिला बाहेर आण ना ! मग आपण सर्व मिळूनच चहा घेऊं !

**सरस्वती**—( हंसून ) ती बाहेर यायला लाजते आहे—

**गजानन**—काय ! कमलाताई लाजते ! सुशिक्षित बायका लाजतात ! आपली लग्नं आपल्याच पसंतीनं जुळवून आणणाऱ्या बायका लाजतात ! आश्चर्य आहे ! मधू, काय रे हें ?

**सरस्वती**—मधुकर, आणूं का बाहेर कमाताईला ?

**मधुकर**—वाः वहिनी !

**गजानन**—मधुकर, तूं सुद्धां लाजायला आरंभ केलास का ? कमाताईला बाहेर येऊं दे का म्हणून विचारतांच तूं अगदीं कावराबावरा

झालास, गंभीर बनलास, इतके दिवस तर मारे लंब्यालंब्या गप्पा मारीत होतास आणि आत्तांच हें !

**सरस्वती**—आणि कमाताई तरी काय ! मधुकर प्रमाणेंच. आज आपण होऊन कांहीं सांगेना. हजार प्रकारांनीं विचारून मला तिच्याकडून काढून घ्यावं लागलं. आजपर्यंत हवी तशी बोलणारी कमाताईची जीभ आज भारीच जड झाली आहे. कांहीं जास्त विचारायला गेलं कीं, अगदीं मधुकरासारखीच कावरीबावरी होते काय आणि गंभीरपणाचा आव काय आणते ! दोघांचा स्वभाव कसा अगदीं एक जुळलाय !

**गजानन**—हं ! म्हणूनच त्यांचं जुळतंय !

**सरस्वती**—पण ही दोघं आज अशी कावरीबावरी कां होताहेत ? गंभीर कां बनताहेत ! होय हो मधुकरपंत, अशा वेळीं असं गंभीर व्हावं लागतं, लाजावं लागतं का !

**गजानन**—तूं आपल्यावरूनच ओळख म्हणजे झालं! ( कमला आंतून दोघींकरितां चहाचे कप घेऊन येते ) या कमाताई—

**कमल**—सरूताई, हें ग काय ! मी तुझी आंतच वाट पहात बसलें—

**गजानन**—कमाताई ! तुम्ही म्हणें लाजून आंत बसला होतां !

**सरस्वती**—आलीस ! नाहीं दम निघाला ! मधुकरांना केव्हां पाहिनसं झालं ना अगदीं ! एवढासुद्धां विरह सहन होत नाहीं ना आत्तांपासून !

**कमल**—बोल बाई हवं तें ! तुझी वेळ आहे !

**सरस्वती**—म्हणजे मी खोटं म्हणतें वाटतं !

**गजानन**—कमाताई, बैस. तूं पण बैस. आपण मिळूनच चहा घेऊं या. कमाताई, तुमचं पण मी मनापासून अभिनंदन करतों. लोक बोलतात पुष्कळ! पण कृतीच्या वेळीं तोंड लपवितात. देशस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडे या तिन्ही जाती जरी सर्रास बेटीव्यवहारानें एक झाल्या तरी पुष्कळ झालं म्हणतों. तुम्ही धैर्य दाखविलंत, आनंद झाला. मधुकराचं अभिनंदन मी अगोदरच केलं आहे. तुमचा घडणारा हा प्रीतीचा सुरेखसंगम तुम्हांला सौख्यदायक आणि जगाला आदर्शवत् होऊं द्या. हं घ्या, घ्या चहा—(सर्वजण चहा घेऊं लागतात. सदू गडी टपाल आणून गजाननरावांस देतो.

चहा पीत असतांनाच गजाननराव टपाल चाळतात. )

**मधुकर**—बरं, गजाभाऊ, निरोप घेतों आतां.

**गजानन**—अं ? काय ? जातो म्हणतोस ? बरं तर ! आतां तुला काळजी नको ! तुमचं कार्य निर्विघ्नपणें थाटामाटांत पार पाडायचं आमच्याकडे आहे. तूं अगदीं अगदीं निर्धास्त रहा. पुन्हा केव्हां भेटशील ?

**मधुकर**—तेंच मी विचारणार होतों. मला मुद्दाम एकांतांत तुमची भेट पाहिजे आहे. अत्यंत महत्वाचं मला तुमच्याशीं बोलायचं आहे.

**गजानन**—ठीक. ठीक. कांहीं हरकत नाहीं. केव्हांही. दुपारीं, संध्याकाळीं, रात्रीं, म्हणशील तेव्हा तूं ये. नाहीं तर मी तुझ्याकडे येईन. नाहीं पण तूंच ये. असा संध्याकाळींच ये फिरायला जायच्या बेतानं, म्हणजे फिरणंही होईल आणि मनसोक्त बोलणंही होईल.

**मधुकर**—बरं येतों तर. ( कमलाताईस ) येणार का ?

**कमल**—अं ! बरोबर जायचं ? हो पण— ( सरस्वतीकडे पहाते. )

**सरस्वती**—कां ? बरोबरच गेलं पाहिजे का अगदीं जोडप्यानं ? भारीच बाई तुम्ही तरी—

**कमल**—अग पण सरूताई, मी काय विचारतें तुला ?

**सरस्वती**—हो, मधुकर, तुम्ही एकटेच जा. कमाताई, काय सांगूं यांना ? मला तुझ्याशीं बोलायचं आहे म्हणून—कां तुला माझ्याशीं बोलायचं आहे म्हणून ? मधुकरपंत—

**मधुकर**—मी एकटाच जातों. माझी कांहीं हरकत नाहीं. मी आपलं सहज विचारलं होतं. ( जातो )

**सरस्वती**—हं, कमाताई, काय सांगायचं आहे तुला ? बोल.

**कमल**—( अडखळत ) सरूताई, मला किनई, तुला पुष्कळ पुष्कळ सांगायचं आहे. आत्तापर्यंत कधीं तुला सांगितलं नव्हतं, कळूं दिलं नव्हतं असं गुपित तुला सांगायचं आहे. पण कसं सांगूं ? कोणत्या शब्दांनीं सांगूं ? माझी जीभच जड होते; मला किनई—

**सरस्वती**—सांग कीं, खुशाल सांग. इथं सांगायचं नसेल, इकडच्या देखत बोलायचं नसेल तर आपण आंत जाऊं—

**कमल**—हो, चल. आंतच चल. पण सरूताई, नको. आतां नकोच. आत्तां मला नीट सांगता येईल असं नाहीं वाटत. खरंच प्रयत्न करूनसुद्धां जमायचं नाहीं. मी पुन्हां येईन त्या वेळीं बोलूं. काय कसं बोलायचं तें नीट जुळवून येईन सांगायला. सरूताई, मी तुला सांगितल्याखेरीज आणि तुझा मनापासूनचा आशिर्वाद मिळविल्याखेरीज मी कधींसुद्धां सुखी व्हायची नाहीं. हें बघ, पण नको, आत्तां नकोच—

**झणिं मनिंचें वदुं कैसें ? गडे, कळेना मजला । वाणि ही जड हो खाशी ॥ ध्रु० ॥ जरि शंकित जीव असा । आशा परि उठवि ठसा । असुखाचा वच साचा । छळित हाच या काला ॥ १ ॥**

**सरस्वती**—तुला बरं वाटेल तसं कर. तूं सुखी होणारच. निश्चित ऐस. तुझ्याकरतां आम्हीं काय वाटेल तें करायला तयार आहोंत ना ! जा आतां निर्धास्त. (कमल जाते. ) हें एक चांगलं झालं नाहीं ? माझी तर कल्पना आहे, मधुकरकमलसारखं जोडपं शोधूं जातां मिळायचं नाहीं—

**गजानन**—पण ही सारी खटपट तुमचीच ना !

**सरस्वती**—मी तर म्हणतें इकडूनच ! आपणासारिखे करिती तात्काळ!

**बोल ऐकोनि घ्यावा । लबाडी । भारि बाई । हृदयिं भरली परी नाहीं अंत कांहीं । भारि बाई॥ध्रु०॥सहज चतुर लीला । वरुनि सुजनतेला । बनवितां छान हो माणसाला । काय बाई॥१॥**

**गजानन**—असं म्हणतेस ! ठीक आहे. अस्मादिक स्तुतीला पात्रच आहेत. बरं. हें एक झालं, आतां दुसरं—

**सरस्वती**—दुसरं काय ?

**गजानन**—आमचा यशवंत राहतो आहे ना तसाच ! माझी इच्छा आहे, त्यालाही याच वर्षी चतुर्भुज करून टाकला पाहिजे !

**सरस्वती**—म्हणजे काय ! मंगलकार्यं जुळविण्याची एजन्सीच स्थापन केली आहे कीं काय आपण ?

**गजानन**—इतकंच नव्हे, आपलं घरसुद्धां मी 'मंगलभुवन' बनविणार ' हें. विवाह, मिश्रविवाह, पुनर्विवाह कशापैकीं कां असेनात ते जुळविले

पाहिजेत, आपल्या घरीं घडवून आणले पाहिजेत. लोकांचे संसार चालू केले पाहिजेत. दुसरं कसलंही नाहीं तरी पोटाचा उद्योग संभाळून एवढं तरी देशकार्य माझ्या हातून व्हावं एवढीच इच्छा आहे. विशेषतः मिश्रविवाह— ज्यामुळें पांढरपेशा वर्ग एकजीव होईल ते मिश्रविवाह—व्हायला आपण तनमनधनानं झटलं पाहिजे. आणि तसा मी झटत राहणार !

**सरस्वती**—मग माझी पण सहाय्याची तयारी आहे. कुणाचाही वेल मांडवावर चढवावा, अगदीं वेळीं खोटंनाटं बोलूनसुद्धां तसं करावं, अशी मुळीं आम्हां बायकांची रीतच आहे ! होय, पण मी म्हणतें, यशवंतरावांच्या बाबतींत आपणच काय तयार व्हायचं ? त्यांची तयारी हवी, त्यांच्याकरतां मुलगी यायला हवी. ( टांगेवाला सामान घेऊन येतो. मागाहून हणमंतराव देशपांडे आणि त्यांची मुलगी मैनाताई येतात. टांगेवाला सामान ठेवतो तिकडे गजाननराव व सरस्वतीचें लक्ष जातें. )

**गजानन**—कोण ! हणमुकाका आले !

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! गजानना, सांपडलं बाबा एकदां तुझं घर ! हुःश ! ( सरस्वती हणमंतरावांस नमस्कार करते. )

**गजानन**—( नमस्कार करतो ) हणमुकाका, नमस्कार करतों.

**हणमंतराव**—( गजाननरावांस ) चिरंजीव भव ! (सरस्वतीस) अष्ट-पुत्रा सौभाग्यवती भव ! गजाभाऊ, तुम्हीं शहरांत येऊन राहिलांत तरी आपल्या बालबोध चाली सोडल्या नाहींत, हें पाहून आनंद वाटला.

**सरस्वती**—( मैना गजाननरावांस व नंतर सरस्वतीस नमस्कार करते तिला, हंसून ) इश्श ! मैनावन्स, मला कसला नमस्कार करतां !

**हणमंतराव**—सुनबाई, हिनं तुला नमस्कार केलाच पाहिजे. अग, गजाभाऊ तिच्यापेक्षां मोठा आहे ना ! तूं तिला वडील आहेस—

**सरस्वती**—पण वन्संचा मान मोठा असतो—

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! सुनबाई, बोललीस ऐकून आनंद वाटला ! बरं जा आतां पोरीला आंत घेऊन. मैना, बाळ, जा आंत आपल्या वहिनीबरोबर. हातपाय धू , प्रवासांतलं विटाळाचं लुगडं बदल.

**सरस्वती**—चला वन्स— (हंसत हंसत मैनासह आंत जाते.)

**गजानन**—हणमुकाका, असं कसं झालं ! तुमच्या पत्राप्रमाणें तर तुम्हीं सकाळींच यायला पाहिजे होता. मी सकाळीं तुमची वाट पहात होतों. वेळ टळून गेली तसं तुम्हीं आज तरी येत नाहीं असं वाटलं.

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! अरे, एम्. एस्. एम्. गाडी कधीं वेळेला आलेली ऐकलीस ! त्या गाडीनें आलों ना मी ! बरं, गजू, मी तुला अगोदर हें विचारतों कीं मी ज्या करतां आलों, तूंही बोलावलंस—

**गजानन**—काका, तें सारं नंतर बोलूं. तुम्हीं दमून आला आहांत. तुमचं स्नान वगैरे होऊं द्या. चहा फराळाचं होईल मग सारा वेळ आहेच आपल्याला मोकळा. आतां एवढंच सांगतों आमच्या मैनाताईचं भाग्य मोठं शिकंदर आहे. तिच्याकरितां ब्रह्मदेवानं अशा योग्य वराची योजना करून ठेवली आहे. मी त्याला आत्तांच बोलावलं आहे. आपले चहापाणी उरकताहे तों तो येईलच. दिसेल तेव्हां आपणच म्हणाल—

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! इतकं झाल्यावर आणखी रे काय पाहिजे मला ! मैनाला एकदां उजवली म्हणजे डोक्यावरचा भार उतरला पहा. बरं, इकडून आंत जायचं नाहीं का !

**गजानन**—चला, मी येतों ना दाखवायला !

**हणमंतराव**—तूं कशाला आणखी ! आंत सुनबाई आहेच कीं. ती करील ना व्यवस्था. (जातो. यशवंत प्रवेश करतो.)

**गजानन**—आलास यशवंत ? वाः ! अगदीं वेळेवर आलास. अगदीं सांगून पाठविल्यासारखा आलास कीं !

**यशवंत**—( हंसून ) म्हणजे काय !

**गजानन**—काय रे यशवंत, कमळाला शोधीत भुंगा धांवतो, कवितेला हुडकीत रसिक भटकत असतो, मधुर आलाप ऐकण्यासाठीं गायन चाललं असेल तिथं गानलुब्ध अचूक धडपडायचाच; अगदीं तसा प्रकार केलास कीं ! यशवंत आपण होऊन तूं आलास !

**यशवंत**—अहो, महाराज, मी आपण होऊन आलों नाहीं कांहीं. मला मुद्दाम निरोप पाठविला होता तो विसरलांच वाटतं ! तुमच्या बोलावण्यावरून आलों आहें आणि तुम्हांला तेंच विचारतोय कीं इतक्या

ताईनें कां बोलावलंत ?

**गजानन**—तुला याच वर्षी चतुर्भुज करायचं आम्हीं निश्चित केलं आहे. तुम्हां तरुणांच्या पायांत बायकांची बेडी अडकविल्याशिवाय तुम्हांला जबाबदारी कळायची नाहीं, तुम्हीं उद्योगाला लागायचे नाहींत, तुम्हांला स्थिरता यायची नाहीं. माझें तर म्हणणें असें आहे कीं, ज्याला जगांत कांहीं पराक्रम करून दाखवायचा आहे त्यानं लग्न हें प्रथम केलं पाहिजे. आतां तूं लग्नाला योग्य झाला आहेस. तुझा अभ्यास पुरा झाला आहे. तुझं वय आणि वेळ पण लग्नाला उक्त आहे. या वयांत तरुणांना चतुर्भुज केलं नाहीं तर ते कसे, केव्हां आणि कुठें घसरतील याचा नेम नाहीं.

**यशवंत**—हें व्याख्यानं समजलं मला. पण हें मला कसं लागूं आहे !

**गजानन**—तेंच पुढं सांगणार आहें. आमच्या गांवचे माझ्या वडिलांचे बालमित्र हणमुकाका आत्तांच माझ्या बोलावण्यावरून आपल्या कुमारी कन्येसह—म्हणजे तुझ्या भावी वधूसह—इथं आले आहेत. मी त्यांना वडिलासमान मानतों. ते मला मुलाच्या ठिकाणीं लेखतात. मैना माझी बहीण आहे ती तुला दाखविण्याकरतां आणि तिच्या नजरेला तुला घालण्याकरितां ही सर्व योजना आहे. याच वेळीं, याच ठिकाणीं वधूवर परीक्षण होऊन जाऊं दे. माझ्या त्या बहिणीचा तूं स्वीकार करावास अशी माझी इच्छा आहे. आणि तसं मी तुला करायला लावणार आहे, समजलास?

**यशवंत**—समजलों. पण गजाभाऊ, माझं आपलं असं आहे—

**गजानन**—आतां तुझं पण न् कसं आहे तें नको आहे ! अरे, म्हातारा चांगला लक्ष्मीधर असून जुन्या चालीरीतीचा, भोळाभाबडा आणि गरीब आहे. मुलगी सुरेख आहे. तुझ्या डोक्यांत प्रीतीविवाहाचें खूळ असेल तर तें काढून टाक. सगळयांच्याच वांट्याला तें येत नाहीं. आमची मैना विवाहोत्तरसुद्धां तुला वेड लावल्याशिवाय रहाणार नाहीं लक्षांत ठेव ! आणि माझ्या म्हणण्याला संमती दे. काय समजलं !

**सरस्वती**—( यशवंतास पाहून प्रवेश करते. ) हं. आत्तां समजलें ! हें अस्सं आहे ! यशवंतरावांना आमच्या मैनावन्स! वाः छान होईल बाई ! मघाशीं माझ्या हें लक्षांतच आलं नाहीं.

**गजानन**—मधांशीं विचार केल्याशिवाय विचारलंस म्हणून लक्षांत आलं नाहीं. मग काय ! कसं होईल !

**सरस्वती**—वाः ! सोन्यापेक्षां पिवळं ! यशवंतराव, तुमची गृहलक्ष्मी तुमचा संसार चांगला थाटील ! पण एक बरीक ह्यांत कमीपणा आहे.

**गजानन**—तो कोणता ?

**सरस्वती**—हा कांहीं प्रीतीविवाह होत नाहीं. हें यशवंतरावांना कसं काय परवडणार ? जुन्या चालीरीतीनं लग्न करणं यशवंतरावांना कितपत पसंत आहे. नव्या जमान्यांत जुनी रीत कुणाला आवडणार ?

**गजानन**—कां ! सारं जग नव्याला डोक्यावर घेऊं लागलं म्हणजे एखाद्यानं जुन्याला मुद्दामच जवळ करावं. लोकांचें लक्ष हटकून तिकडे वेधलंच पाहिजे. यशवंताची काळजी तुला नको. त्याचा कान धरून त्याला मी तयार करतों. तूं मैनाला ठाकठीक सजवून आण. हा—हा ठीक आहे. हा नेहमींच असा नटलेला असतो. तेव्हां याच्याबद्दल पंचाईत नाहीं. आमच्या हणमुकाकांना यापेक्षां साधासुधा जांवई दिसला तरी त्यानां तो हवाच आहे. ते जुन्या चालीचे आहेत.

**सरस्वती**—ते जुन्या चालीचे आहेत पण नवं चांगलं असेल तेवढं घ्यायची त्यांची तयारी आहे. मैनावन्संना चांगलं स्थळ मिळालं तर कऱ्हाड्यांत, कोकणस्थांत देखील द्यायची त्यांची तयारी आहे. बोलतां बोलतां आत्तां म्हणाले ना ते ? आणखी त्यांनीं विचारलं दिखील कीं किती ठिकाणीं खडे टाकून ठेवले आहेत, कुठलं जमण्यासारखं आहे, तूं एखादा मुलगा पाहिला आहेस का ?

**गजानन**—असं का ? बाकी यशवंत, आमचे हणमुकाका देशस्थ असून त्यांची तयारी तर चांगली आहे. तुलाही शुभशकुनच आहे. देशस्थ—कऱ्हाडे विवाह होऊन जाऊं द्या एकदां !

**सरस्वती**—त्यांनीं येतांना आपल्याबरोबर तिकडून बऱ्याच जणांची टिपणें आणखी पत्ते पण आणले आहेत. ते हळूंहळू साऱ्या शाळा आणि कॉलेजं धुंडाळणार आहेत.

**यशवंत**—म्हणजे ते कांहीं माझ्यावरच अवलंबून नाहींत तर !

**गजानन**—यशवंता, बघ रे बाबा, सावज हातचं जाऊं देऊं नकोस हं! बरं, सरूताई, हणमुकाका काय करताहेत! मैनाचं अंग धुणं झालं का! झाल्यावर मैनाच्याच हातीं चहा पाठवून दे म्हणजे आपोआप रीतसरच वधूवर परीक्षणकार्याला आरंभ होईल.

**सरस्वती**—हणमुकाका संध्येची आचमनं टाकताहेत, मैनावन्संचं अंग धुणं चाललंय-हणमुकाका मला फारच नांवाजताहेत हो! ते असे-पर्यंत जरा जपूनच वागायला हवं!

**गजानन**—हो तें मीच तुला सांगणार होतों. त्यांनीं येतांक्षणीच आपल्याला बाळबोध वळणांत काढलं आहे; तो त्यांचा समज कायम राहिला पाहिजे. नाहींतर रोजच्याप्रमाणें निलाजऱ्यासारखं वागशील आणखी—

**सरस्वती**—मला नको सांगायला. आपणंच संभाळावं. नाहींतर हिंड-गेपणानं वागायची संवय लागलेली ती आपलाच घात करील. सरूताई बाईसाहेब, मेहेरबान, हुजूर असं पटकन् तोंडांतून जाईल निघून—

**गजानन**—वेळींच सूचना दिल्याबद्दल राणीसरकारांचा मी फार आभारी आहें.

**सरस्वती**—आणखी सांगतें दिवसभर माझ्यापाशीं बोलायचं नाहीं, माझ्या आंवतीभंवती जेव्हांतेव्हां हिंडायचं नाहीं. वरच्चेवर कशाचं तरी निमित्त काढून स्वयंपाक घरांत हेलपाटे घालायचे नाहींत, कपाळ दुखण्याचं सोंग आणून सगळयांच्या देखत मला बोलवायचं नाहीं—

**गजानन**—अहाहा! पूर्वीं हे सारे प्रकार प्रचलीत होते नाहीं! दिवसभर अबोला, घरांतच विरह. पण रात्रीं भेटल्यावर बोलण्याभेटण्याचा काय और मजा येत असेल त्यावेळीं! आतां राजाराणीच्या राज्यांत ती मजाच राहिली नाहीं. बरं झालं. हणमुकाकांनीं येऊन आमच्यावर उपकारच केले म्हणायचे. ते आहेत तिथपर्यंत जुन्या काळाचा थोडा तरी मजेदार अनुभव घेऊं—

**सरस्वती**—त्या कल्पनेनंसुद्धां मला कित्ती आनंद होतोय!

**गजानन**—बरं, जा आतां. हणमुकाकांची संध्या आटोपली असेल. ते इतक्यांत इथं येतील. त्यांच्यासमोर आणखी हें नको! आणखी हें

पहा, मैनाबरोबर ये. पण बाहेर येऊं नकोस. त्या दारांत एक फळी लावून तिथें उभी रहा. तिथून डोकावून पहा म्हणजे तें छान दिसेल—

**सरस्वती**—अगदीं आज्ञेप्रमाणें वागतें—

**गजानन**—थांबा मेहेरबान, यशवंत तसाच आला आहे. वधुपरीक्षा झाल्यावर जुन्या रीतीप्रमाणें खण आणि पेढ्यांचा पुडा मुलीला द्यावा लागतो ना!

**सरस्वती**—माझ्याजवळचा खण आणून देतें. आणखी पेढ्यांचा पुडा आणायला सदूला पाठवितें.

**गजानन**—ये: ! शाबास. चतुर आहेस. ( जाते ) कां, यशवंत, आमच्या बोलण्याचा मजा येतो कीं नाहीं! तुला सांगतों, आमचा हा असा मजा नेहमींच असतो. तूं येत जा म्हणजे तुला समजेल. आतां सांग, आमच्याकडे पाहिल्यावर तुला नाहीं वाटत, आपण लवकर चतुर्भुज व्हाव आणि असा मजा करावा ! अरे बायको म्हणजे संसारसुखाचा अलंकार आहे आणि ती मनासारखी मिळायला भाग्य घेऊन यावं लागतं. म्हटलंच आहे, 'पूर्वदत्तेषु या भार्या!' बाकी तुझं भाग्य आहे तसं. आमची मैना तुला हा अनुभव आणून देईल, माझी खात्री आहे. (हणमुकाका तोंडानें कांहीं पुटपुटत येतात) झालं आन्हिक हणमुकाका !

**हणमंतराव**—झालं बाबा ! अगदीं यथास्थित ! ( गजाननराव यशवंतास हणमुकाकांना नमस्कार करण्याविषयीं सुचवतात ) बरं, हें कोण म्हटलंस गजानना ! ( यशवंत नमस्कार करतो ) आयुष्मान भव !

**गजानन**—मी ज्याच्याबद्दल तुम्हांला पत्रांतून कळविलं होतं तोच हा माझा मित्र. याचं नांव यशवंत, ग्रॅज्युएट आहे. हुषार आहे, व्यसन तसं कसलंच नाहीं. साधी रहाणी आणि उच्च विचार याचा भोक्ता आहे. तुम्हीं येणार होता म्हणून त्याला कळविलं होतं—बोलावलंच होतं मी त्याला —त्याप्रमाणें आलाय तो !

**हणमंतराव**—रामकृष्ण हरी ! हेच कां ते ? ठीक आहे, आनंद आहे. ( उठत ) बरं, गजाभाऊ, मी म्हणतों मैनाला आत्तांच बाहेर बोलवावी म्हणजे एकाच बैठकींत होऊन जाईल सर्व. का ?

**गजानन**—तुम्हीं कशाला उठतां ? मी जाऊन सांगतों आंत.

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! ( गजाननराव आंत जातात. ) आपलं नांव काय सांगितलं पहा आमच्या गजाननानं—

**यशवंत**—माझं नांव यशवंत.

**हणमंतराव**—आडनांव ?

**यशवंत**—आडनांव योगी !

**हणमंतराव**—योगी ! अरे वा: ! आपलं गांव कुठें ? घरीं कोण आहे ?

**यशवंत**—गांव सातारा. घरीं वडील, मातोश्री, दोन भाऊ आहेत. आम्ही सर्व एकत्रच आहोंत—

**हणमंतराव**—असो. आनंद आहे. मुलगी दहा जणांत पडावी अशीच आमची इच्छा आहे ! आणखी जरा विचारूं कां ! कांहीं जमीनजुमला !

**यशवंत**—आहे, पण असून नसल्यासारखाच आहे !

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! बाकी नाहीं तर नाहीं. आपल्याला पाहिजे तो डाग ठीक असला म्हणजे झालं. आतां एकच प्रश्न ! आपला नोकरी करण्याचा विचार—

**यशवंत**—तें अजून नक्की नाहीं. मिळाल्यास नोकरी करीन. जमल्यास स्वतंत्र धंद्यांत शिरेन. ( गजाननराव व त्याच्यामागून मैना चहा, फराळाचें सामान वगैरे घेऊन येतात; दारांत सरस्वती येऊन उभी रहाते. मैना चहा फराळाचें टेबलावर ठेवून बाजूस उभी रहाते.)

**गजानन**—मैना, बैस. उभी कां ! ( ती इकडे तिकडे पहाते. ) खालीं नको बसायला कांहीं. चांगली त्या खुर्चीवर बैस. लाजायचं कारण नाहीं, भ्यायची जरूरी नाहीं. इथं कोणी परकं नाहीं. हं, यशवंत, ही आमची मैना ! पाहून घे—( स्वतःच चहाचे पेले व फराळाचें प्रत्येकाच्या पुढें देत ) काय तुला नांव गांव, भाऊ बहिणी, शिक्षण वाचन वगैरेबद्दल विचारायचं असेल तें विचारून घे.

**यशवंत**—मला यापैकीं कांहींच विचारायची आवश्यकता वाटत नाहीं.

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! यापैकीं नाहीं तर मग काय विचारणार?

**गजानन**—हणमुकाका, प्रश्न विचारण्याच्या जुन्या तऱ्हा आतां राहिल्या नाहींत. आतां म्हणजे, नाटक-सिनेमाला जाणं आवडतं का ?

गोऱ्यालोकांच्या नाचाला येशील का ? कविता रचता येतात कीं नाहीं, गाणीं गातां येतात कां ? चित्रकलेचा नाद कितपत आहे, व्याख्यानाची संवय आहे कीं नाहीं. प्रसंगीं इराण्याच्या हॉटेलांत येण्याची मनाची तयारी होईल कीं नाहीं ? इत्यादी इत्यादी—

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! हे का प्रश्न मैनाला विचारण्यांत येणार ?

**गजानन**—छे छे ! आमचा यशवंत हे असले प्रश्न विचारणार नाहीं. आपली आजकालच्या तरुणांच्या प्रश्नांची आवडनिवड तुम्हांला सांगितली. यशवंत, काय विचारतोस प्रश्न ? विचार. ( यशवंत नुसताच पहात रहातो. ) विचारायच्या अगोदर पाहून घेतोस ? तरी चालेल. नीट पहा. खेडयांतली ब्यूटी आहे. शहारांतली फिक्कट, कुचकट, रोगट अशीं नाहीं कांहीं. तिची हेल्थ पहा. आईवेगळ्या आपल्या मुलीचं आमच्या हणमुकाकांनीं लहानपणापासून संगोपन कसं केलं आहे पहा. Sound mind in a sound body ! तुला माहीतच आहे. याला म्हणतात ब्यूटी आणि यालाच म्हणतात हेल्थ ! हं विचार आतां.

**यशवंत**—( खांकरून गंभीरपणानं ) म्हणजे माझं आपलं असं आहे. गजाभाऊ, हं, ( मैनास ) लग्न व्हावं असं स्वतःलाच वाटतं कीं वडिलांची इच्छा म्हणून–रीत पडली आहे म्हणून–लग्न करून घेण्याची तयारी आहे ?

**मैना**—स्वतःलाच लग्न व्हावं असं वाटतं !

**यशवंत**—जन्माचा सोबती कसा असावा याबद्दल कधीं विचार केला आहे काय ? रूपवान् कीं गुणवान् ?

**मैना**—दोन्ही एकत्र असली तर नको कुणाला ! दोन्हीपैकीं एकाच संबंधीं विचार करायची पाळी आली तर मी प्रथम गुणालाच महत्त्व देईन.

**गजानन**—ब्यूटी !

**यशवंत**—पण मुलींना तर ‘ पति दे गोरा गोरा पान ’ म्हणून देवीजवळ नवस करावा असं वाटतं असं म्हणतात—

**मैना**—तें पूर्वीच्या काळीं; आतां नाहीं. सद्गुणांचे अलंकार पुरुषांचा कुरुपपणा झांकतात. गोरेगोमटे आणि कपाळ करंटे कुणाला हवेसे वाटणार?

**गजानन**—हिअर ! हिअर ! यशवंत ऐक.

**यशवंत**—नवरा नोकरदार असावा कीं स्वतंत्र धंदेवाईक असावा !

**मैना**—ऐतखाऊपेक्षां नोकरदार बरा आणि नोकरदारापेक्षां स्वतंत्र उद्योगीच उत्तम ! मुख्य म्हणजे पराक्रमी पाहिजे. पराक्रम नोकरींतही दाखवितां येईल. पण नोकरींत गुलामगिरी अंगीं मुरते हा दुर्गुण आहे. म्हणून मी तर स्वतंत्र उद्योगीच पहिल्यांदा पसंत करीन !

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! मैना ! पोरी ! इतका विचार केला होतास तरी केव्हां ग ! मी तर अगदीं थक्कच झालों !

**गजानन**—एक्सलंट ! यशवंत आणखी कांहीं विचारणार आहेस ?

**यशवंत**—आणखी दोन प्रश्न आणि खलास !

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! बरं विचारा. मैनापेक्षां आतां मलाच जास्त धीर आला आहे.

**यशवंत**—एकत्र कुटुंबांत राहण्याची इच्छा जास्त कीं राजाराणीनींच स्वतंत्र संसार थाटावा असं वाटतं ! तसंच आपल्याकडे चार लोक नेहमीं आलेले आवडेल कीं वर्षानुवर्ष कुणीच फिरकलं नाहीं तर बरं वाटेल !

**मैना**—परिस्थितीनं दोघानांच रहावं लागलं तर राहिलं पाहिजे. पण एकत्रांतलं सुख मिळालं तर तें अवश्य आहे. तसंच संसार मांडून बसल्यावर चारजण आले गेले नाहींत तर तो संसार कसला ! वैराण वाळवंटच तें!

**गजानन**—स्प्लेंडिड ! (सदू पेढ्याचा पुडा व खण गजाननरावांस देतो.)

**यशवंत**—आतां एकच प्रश्न ! समान हक्कांच्या तत्वाबद्दलचे आपले विचार थोडक्यांत कळतील का !

**मैना**—परिस्थितीवर तें अवलंबून ठेवलेलं चांगलं. ध्वनी तसा प्रतिध्वनी निघणारच !

**यशवंत**—अच्छा ! पुरे ! गजाभाऊ, यापेक्षां मला जास्त कांहीं विचारायचं नाहीं ! माझं आपलं असं आहे—

**गजानन**—ठीक आहे. ( मैनास खण व पेढ्याचा पुडा देत ) हं, मैना, तुला जायला आतां हरकत नाहीं. ( मैना जाते. )

**यशवंत**—ठीक आहे. गजाभाऊ, येतों मी. ( हणमंतरावांस ) बरं येतों मी ! ( नमस्कार करून जातो. त्याला गजाननराव पोंचवून येतो. )

**हणमंतराव**—हं, काय बाबा गजानना, काय म्हणतो आहे तुझा मित्र ?

**गजानन**—काका, त्याची नको काळजी तुम्हांला आतां ! या आपल्या मंगलभुवनांत सर्व कांहीं शुभमंगल होऊन जाईल पहा !

**हणमंतराव**—पण म्हणाले काय ते गजेश्री ! मैना त्यांच्या परीक्षेत उत्तीर्ण झाली काय !

**गजानन**—नंतर सांगतो म्हणाला ना तो !

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि ! इतके झाल्यावरही नंतर आहेच का ? बरं ठीक आहे ! (जातात.)

---

## प्रवेश २ रा

(**कमलेची खोली.** कमला व यशवंत)

**यशवंत**—कमल, वाः !

**कमल**—यशवंत, आलांत तुम्हीं ? या.

**यशवंत**—पण तूं तर बाहेर जाण्याच्या तयारींत दिसतेस !

**कमल**—हो, पण (घड्याळ पाहून) इतका वेळ मी वाट पाहिली; आतां तुम्हीं येत नाहीं अशी खात्रीच झाली म्हणून मी बाहेर निघालें.

**यशवंत**—मी वेळेवर येणार. पण माझ्या सायकलनं दगा दिला. वाटेंतच पंक्चर झाली. त्यांत इतका वेळ गेला ! जरा वेळ आणखी झाला असतां तर आपली भेटही झाली नसती.

**कमल**—आणि मी मुद्दामच बाहेर गेलें असा तुम्ही आपला आणखी गैरसमज करून घेतला असतां. नाहीं का !

**यशवंत**—पण हें तरी काय ! निमित्ताला टेकल्यासारखंच वागतेस ! मी तुझ्याशीं बोलायला आलों आहें, तरी तूं आपल्या खोलीचं कुलूप काढीत नाहींस ! आपण इथं असंच बोलत उभं रहायचं काय !

**कमल**—त्याला काय हरकत आहे ! मला पण फारसा वेळ नाहीं. जरा जरुरीच्या कामाला जायचं आहे. आपण इथेंच थोडा वेळ बोलूं.

**यशवंत**—जशी तुझी इच्छा !

**कमल**—मग बोला तर !

**यशवंत**—कमल, बोल, तूं मला तारणार कां मारणार ?

**कमल**—( दचकून ) काय ? मी तुम्हांला तारणार कीं मारणार ?

**यशवंत**—म्हणजे माझ्या हृदयाची स्वामिनी होण्याचं वचन देऊन मला तारणार कीं नकार देऊन मला मारणार ? (कमल कांहींच न बोलतां यशवंताकडे पहात रहाते.) कमल, अशी गोंधळून जाऊं नकोस. जसं माझं तुझ्यावर प्रेम आहे, तसंच मधुकर तुझ्यावर प्रेम दाखवितो हें मला माहीत आहे. मधुकर कां मी याबद्दल तुझ्या मनांत काय चाललं आहे याची मला कांहींच कल्पना नाहीं आणि तूं अमक्यावरच प्रेम कर असं सांगण्याचा मला अधिकार नाहीं. तो तुझ्या स्वतंत्र बुद्धीचा प्रश्न आहे. त्याच तुझ्या स्वतंत्र बुद्धीला स्पष्ट विनंती करायला आलों आहें. बोल, कमल सोक्ष का मोक्ष ?

**कमल**—खरं सांगू का यशवंत ? कुणाबद्दल अजून विचार करायला मला वेळच मिळाला नाहीं.

**यशवंत**—तुला वेळ झाला नाहीं, पण माझा तिकडे काळ उभा आहे ! माझ्या एका मित्रानं, एक उपवर वधू माझ्याकरितां शोधून काढली आहे. ती त्यानं मला दाखविली, वधुपरीक्षा करायला भाग पाडलं आणि लगेच कबुलीजबाब मागितला—

**कमल**—( किंचित् गोंधळून व अस्वस्थ होऊन) अगबाई ! खरंच ? मग काय आपण जबाब दिलांत ? होकार दिलांत का ? त्या वधुशीं विवाह करायचा निश्चय केलांत कां ? काय केलंत यशवंत ?

**यशवंत**—अजून कांहींच जबाब दिला नाहीं मी—

**कमल**—नाहीं ना दिलांत ? बरं झालं बाई !

**यशवंत**—तुझ्या या उद्गाराचा अर्थ मी अनुकूल करून घेऊं का ?

**कमल**—यशवंत, तुम्ही माझ्यावर खरंच प्रेम करतां का ?

**यशवंत**—हें काय विचारतेस कमल ! इतके दिवस—

**कमल**—तसं नव्हे. तुम्ही माझ्यावर प्रेम करतां म्हणजे काय ? माझ्या रूपावर लुब्ध आहांत, माझ्या नटण्यामुरडण्यावर खूष आहांत, माझ्या शहाणपणाला शिरावर धारण करतां ! होय ना ?

**यशवंत**—हें तुलाच कबूल आहे.

**कमल**—हें झालं. पण माझ्यांतले दुर्गुण, दोष, व्यंग, उणेपणा याबद्दल कधीं विचार केला आहे काय ?

**यशवंत**—काय ! तुझ्यांत आणि दुर्गुण, दोष, व्यंग ! शक्यच नाहीं !

**कमल**—मानवप्राणी सदोष असतो हें तत्व विसरलांत का ? यशवंत, मी दुर्गुणी आहें. दोषी आहें. माझ्यांत आज नसले तरी कुणी सांगावें, उद्यां एखादं व्यंग निर्माण होईल ! या सर्वांवर तुम्ही प्रेम कराल काय ? करतां काय ?

**यशवंत**—तुझ्यांत दोष, दुर्गुण मला दिसतच नाहीं तर मी काय सांगूं ?

**कमल**—नीट डोळे उघडे ठेवून पहा. चौकशी करा. शोध करा, नाहीं तर मला विचारा. मी सांगेन माझ्यांतले दोष-दुर्गुण—

**यशवंत**—मग सांग तर !

**कमल**—सांगेन. पण आतां नाहीं. आपण दोन दिवसांनीं पुन्हां भेटूं, त्यावेळीं मला आपल्याशीं बरंच बोलतां येईल.

**यशवंत**—कमल, तूं दोन दिवसांनीं जें सांगशील त्याचं उत्तर मात्र मी आज देऊन ठेवतों. तूं कशीही ऐस. तुझे दोष दुर्गुण सर्व कांहीं मला मान्य आहेत. त्यांच्यासुद्धां तुझा स्वीकार मी आनंदानें करीन.

**कमल**—यशवंत, तुमच्या आत्तांच्या बोलण्यानं तुमच्याबद्दलचा माझा आदर आणखी वाढला आहे !

**यशवंत**—तुझा वाढता आदर माझी आशा फुलवीत आहे. पण माझ्या आशेची दारुण निराशा नाहींना होणार !

**कमल**—पुन्हां दोनतीन दिवसांनीं आपलं भेटायचं ठरलं आहे ना !

**यशवंत**—अच्छा ! कमल, यापेक्षां जास्त वेळ मी घेत नाहीं. माझ्या-बद्दल अनुकूल विचार करीत आहेस हेंच जास्त आहे. मी आतां निश्चित झालों. तीन दिवसांनीं मी पुन्हां तुझ्याकडे येईन.

**कमल**—नको मीच तुमच्याकडे येईन !

**यशवंत**—चालेल.

**कमल**—बरं, मग आतां घेऊं या परस्परांचा निरोप !

**यशवंत**—अगदीं तितकंच निकडीचं काम आहे का ! याच वेळीं गेलं पाहिजे का ! मी म्हणणार होतों, तूं आपली सायकल घेतली असतीस, असेंच आपण जरा वेळ बंडवरून चक्कर टाकून, कँपमध्यें एफ्-कॉर्नेलियांतून टिफीन झोडून आलों असतों मजेंत. तुला इथपर्यंत पोंचविलं असतं अन् मग मी घरीं गेलों असतों !

**कमल**—कांहीं हरकत नव्हती तशी ! पण नको आतां. पुन्हां कधीं तरी ! तुमचा हिरमोड करावा लागतो आहे. माफ करा. आज मला उत्सुकताच नाहीं !

**यशवंत**—बरं. येतों तर. उद्यां आपली भेट नक्की होईलच.

**कमल**—नक्की बहुतेक !

**यशवंत**—बहुतेक पण नक्की ! (दोघे हंसतात व जातात.)

---

## प्रवेश ३ रा

(**रस्ता**-हणमंतराव व मधुकर.)

**हणमंतराव**—मधुकरपंत, अहो मधुकरपंत-( मधुकर थांबून मागें हणमंतरावाकडे पाहतो. ) मधुकरच ना आपण ! परवां आपण आमच्या गजाभाऊकडे—म्हणजे तुमच्या गजाननराव देवांच्याकडे—आला होता. त्यावेळीं पाहिलं होतं मी तुम्हांला. त्याचवेळीं आपलं नांवही पण कळलं. आपलं सबंध नांव काय बरं !

**मधुकर**—मधुकर गंगाधर देवधर.

**हणमंतराव**—असं! म्हणजे आपण कोकणस्थ आहांत! ठीक. आपण मला वाटतं बी. ए.—

**मधुकर**—मी एल् एल्. बी. आहें !

**हणमंतराव**—असं कां ? अरे वाः ! मग वकिली चालू केली असेल! छान जमलं असेल प्रॅक्टीस !

**मधुकर**—तसं कांहीं नाहीं अजून. सध्यां भामे वकिलांच्या हाताखालीं प्रॅक्टिस करीत असतों. आणि लवकरच—

**हणमंतराव**—स्वतंत्र वकिली करूं लागणार! तेंच ठीक. प्रथम अनुभव पाहिजे थोडासा—

**मधुकर**—नाहीं–नाहीं. मी वकिली करणारच नाहीं. प्रॉव्हिन्शिअल सर्व्हिसकडे शिरणार आहें.

**हणमंतराव**—प्रॉव्हिन्शिअलमध्यें शिरणार! म्हणजे?

**मधुकर**—सरकारी नोकरी धरणार आहें.

**हणमंतराव**—वाः वाः! तें फारच उत्तम! सोन्यापेक्षां पिवळं म्हणा या दिवसांत. या दिवसांत नोकरीसारखं सुख नाहीं, नोकरासारखा अधिकार नाहीं. फार उत्तम गोष्ट आहे. बरं, मधुकर, असं पहा, मला आणखी जरा आपली माहिती हवीशी वाटते. विचारूं काय?

**मधुकर**—हो हो खुशाल. मी सहसा कुणाला माझी माहिती देत नाहीं. पण तुम्हांला म्हणून नाहीं म्हणत नाहीं. विचारा बेशक!

**हणमंतराव**—मग आपल्यासंबंधीं शक्य ती माहिती आपणच द्यावी.

**मधुकर**—मी कवी आहें!

**हणमंतराव**—हं हं! अरे वाः!

**मधुकर**—मी लेखक आहें. कादंबऱ्या लिहितों, नाटकं लिहितों—

**हणमंतराव**—वा! वा! छान! छान! उत्तम! उत्तम! जगप्रसिद्ध त्याशिवाय होतां येतच नाहीं!

**मधुकर**—शिवाय टीकाकार आहें! वाटेल त्याला लेखणीच्या फटकाऱ्यासरशी लोळवतों.

**हणमंतराव**—ठीक! ठीक! उत्तम! टीकास्त्र पाहिजेच परजलेलं. अहो, कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा वाढणं शक्यच नाहीं! बरं आणखी!

**मधुकर**—आणखी काय? काय काय नाहीं म्हणून विचारा! सर्व कांहीं आहें. हौशी आहें, खेळाडू आहें, उद्योगी आहें. थोडक्यांत म्हणजे सर्व बाजूंनीं अप-टू-डेट आहें. पण काय हो, अजोबा!

**हणमंतराव**—अं हं! मी आजोबा नाहीं अजून. मी हणमुकाका आहें. मला सारेजण हणमुकाका म्हणतात. आपणही त्याच नांवानं हाका मारा!

**मधुकर**—बरं, हणमुकाका तर हणमुकाका! हणमुकाका, माझ्या-



**मधुकर**—पण काय हो आजोबा ?  **हणमंतराव**—अं हं ! मी अजून आजोबा नाहीं !

बद्दल जी इतकी बारीकसारीक करून चौकशी करतां ती कशाकरतां? मला आपली एखादी मुलगी तर देऊं करायचा विचार नाहीं तुमचा?

**हणमंतराव**—रामकृष्ण हरि! मधुकरपंत, चतुर आहांत. हुषार आहांत! पसंत पडलं आपल्याला. अगदीं नेमकें ओळखलंत! जसे दिसायला गोरे, तसे विचारानं पण गोमटे आहांत. हें लक्षांत आलं. जांवई म्हणून तुम्ही आपाल्याला पसंत पडलांत!

**मधुकर**—काय? खरंच म्हणतां काय हें?

**हणमंतराव**—तर काय थट्टा करतों तुमची? अहो, मी माझ्या मुलीला इथें आणली आहे. तुमच्या गजाननरावांच्याकडेच तिला ठेविली आहे. तिच्यासाठींच पायाला चक्र बांधून झाडून साऱ्या शाळा कॉलेजांतून भटकतों आहें आज तीन दिवस. आम्ही आलों त्यांच दिवशीं एक मुलगा येऊन पाहूनसुद्धां गेला. गेला तो गेलाच. पुन्हां आला नाहीं आणि त्यानं कांहीं कळवलंही नाहीं. या तीन दिवसांच्या भ्रमंतींत शाळा-कॉलेजांतला एकही तरुण मला पास पडला नाहीं!

**मधुकर**—कां?

**हणमंतराव**—अहो, कां म्हणून काय विचारतां? शाळाकॉलेजांतले तरुण कसले ते? इथून तिथून पाप्याचे पितर! झाडून साऱ्या पुरुषी पोषाख केलेल्या बायका! त्यांतून कोण, कसा, कां पसंत करायचा?

**मधुकर**—पण पसंती तुमची खरी कां तुमच्या मुलीची खरी?

**हणमंतराव**—मधुकरपंत, अहो, जिथें मला जांवई आवडेना तिथें माझी मुलगी पति कसा पसंत करणार? माझी पोर आहे ती. तिला पति पसंत व्हायला त्याच्या अंगीं तसाच वकूब पाहिजे!

**मधुकर**—मग पुढें?

**हणमंतराव**—शोधतां शोधतां आज मनासारखा जांवई मिळाला. मधुकरपंत, तुमची निवड आम्ही केली. अगदीं ठाम केली. तुम्ही मला पसंत पडला तसेंच माझ्या पोरीला पण पसंत पडाल ही खात्री बाळगा!

**मधुकर**—तें होईल कदाचित! पण हणमुकाका, तुम्हीं देशस्थ ना? तुमची मुलगी मला पसंत पडली पाहिजे ना?

**हणमंतराव**—त्याची खात्री मी देतों. आम्हीं देशस्थ असलों तरी माझी मुलगी–स्तुति नाहीं करीत–पण तुम्हांला सांगतों, शंभर पोरींत अशी पोरगी तुम्हांला मिळणार नाहीं. अहो, काय सांगूं तुम्हांला, पोरगी म्हणजे निखालस माझ्या कुटुंबाचा नमुना बरं ! अगदीं हुबेहूब ! आज दहा वर्षे झालीं आमच्या कुटुंबाला–दहा वर्षे झालीं निर्वतली त्याला ! पण दहा वर्षांत पोरीनं माझ्या बायकोची मला आठवण होऊं दिली नाहीं. कशांतही कमी पडूं दिलं नाहीं. दिसायला तशी, कामाला तशी, वागायला तशी, ( खिशांतून फोटो काढून मधुकराच्या हातीं देत ) ही पहा पोर ! तुम्हीं म्हणाल आपल्या पोरीची हा गृहस्थ अवास्तवच स्तुती करतो आहे. पण नाहीं बरं ! पहा म्हणजे तुम्हींच म्हणाल—

**मधुकर**—फोटोवरून तर तुमची मुलगी नक्षत्रासारखी आहे बोवा ! पण यांत फोटोग्राफरचं कौशल्य किती आणि—

**हणमंतराव**—तसं कशाला? तुम्हीं समक्षच चला ना पहायला. मी काय तुम्हांला फोटो दाखवूनच फसवीन म्हणतां ! आणि या गंभीर गोष्टी भर रस्त्यावर बोलण्यासारख्या आहेत म्हणून आपण बोलत आहोंत का ! सहज गोष्टींवरून गोष्टी निघाल्या म्हणून बोलूं लागलों इतकंच. वास्तविक हें खरं नव्हे. खरं म्हणजे, मी तुम्हाला घरीं घेऊन जायचं, तुम्हाला माझी मुलगी दाखवायची, परीक्षा घ्यायला लावायची, तिच्या दृष्टीला तुम्हांला पाडायचं, आणि मग ठरवून टाकायचं. मग बोला, केव्हां येतां मुलगी पाहायाला ?

**मधुकर**—मी केव्हांही येईन पाहायला. त्याला कांहींच हरकत नाहीं. आपण म्हणतां त्याप्रमाणें आपली मुलगी मला पसंतही पडेल. मीही पसंत पडेन. पण हणमुकाका, खरंच आपण आपली मुलगी मला देऊं इच्छितां ? देऊं शकाल ?

**हणमंतराव**—मग काय, इतका वेळ आपल्याशीं शिळोप्याच्या गोष्टी केल्या कीं काय मी ?

**मधुकर**—तसं नव्हे. म्हणजे मी असा—

**हणमंतराव**—असा म्हणजे? तुम्ही कोकणस्थ, आम्हीं देशस्थ हेंच ना? अहो, अलीकडे आमच्या मुलींना कोंकणस्थच नवरे आवडूं लागले आहेत.

म्हणजे असं, ते गोरे असतात, विद्वान् असतात, कर्तबगार असतात, शिवाय आपल्या बायकांना तें सुखांत ठेवतात. माझ्या मुलीची अशीच समजूत आहे आणि म्हणून तर मी या व्यापांत पडलों आहें. आणखी काय तुमची शंका ! कळूं द्या. तुमच्या पसंतीबद्दल प्रश्नच नाहीं.

मधुकर—तें तर आहेच. त्याबद्दल माझी खात्रीही आहे. मी आजपर्यंत पुष्कळांना पसंत पडलों आहें. पण हणमुकाका, माझ्या कांहीं अटी आहेत. त्या कुणाला पसंत पडत नाहींत; तिथं सारं बिघडतं आहे. सध्यां सुद्धां एकदोन ठिकाणीं अशींच तुमच्याप्रमाणें बोलणीं चालू आहेत; पण माझ्या अटी कोणी मान्य करीत नाहीं मी तुम्हांला सांगूं माझ्या अटी ! कबूल असतील तर तुमची मुलगी मी अवश्य करून घेतों. बोला. सांगूं !

हणमंतराव—बोला तर खऱ्या.

मधुकर—मला विलायतची सफर करायची आहे आणि त्या सफरीकरतां श्वशुरांनीं खर्च केला पाहिजे.

हणमंतराव—हें काय सांगायला पाहिजे ! तुम्ही आमचे जांवई झाल्यावर तें करणं आम्हांला भागच पडणार आहे !

मधुकर—श्वशुरांनीं आम्हांला बंगला बांधून दिला पाहिजे.

हणमंतराव—कबूल ! मला कुठं दहापांच मुली आहेत. एकुलती एक मुलगी. मी जरूर तिच्या सुखाकरतां बंगला बांधायला तयार आहें !

मधुकर—आणखी एकादी मोटार आणि घरांत गडी माणसं आपल्या खर्चानें श्वशुरांनीं द्यायला पाहिजेत.

हणमंतराव—ह्या गोष्टी न बोलतांच होण्यासारख्या असतात. झाल्या अटी कीं आणखी कांहीं आहेत ?

मधुकर—आणखी पुष्कळ आहेत. पण मुख्य इतक्याच. ह्या अटी कबूल करील तो बाकीच्या कबूल करीलच. तर बोला—

हणमंतराव—कबूल आहे मला. पण मी कबूल म्हटल्यावर अखेरची कबूली तुमचीच खरी समजायची कीं तुमच्यावरही कोणी आहे ?

मधुकर—नाहीं. तसा माझा मीच मुखत्यार आहें. मला जवळपासचं नातेवाईक कोणी नाहीं. एक फक्त आई आहे. पण ती आपल्या एका

श्रीमंत मैत्रिणीबरोबर अमेरिकेला गेली आहे. माझ्या लग्नालासुद्धां तिकडचं कुणीही येणार नाहीं !

**हणमंतराव**—जसा योगायोग. आतां मधुकरपंत, घरीं यायचं, मुलगी पाह्यची, हें तुमच्याकडे राहिलं. बाकीं बोलणं झालंच आहे. बरं, कुणीकडे जायचं आहे आपल्याला ? याच बाजूला का ! मग चला तर. मलाही याच बाजूला म्हणजे घरींच जायचं आहे ! चला चार पावलं आणखी बोलत बोलत जाऊं !

**मधुकर**—अगदीं अवश्य ! भावी श्वशुरांच्या आज्ञेला आतांपासून मला मान दिलाच पाहिजे !

**गोड बोल बोलतां-लोभ-मोह जाणतां ॥ ध्रु० ॥ त्यजिन वचन का कदा ? सुखद दिवस दाविता ॥ १ ॥** ( जातात. )

---

## प्रवेश चौथा

( गजाननरावांचें घर-सरस्वती व मैनाताई )

**मैना**—( विणीत, स्वतःशींच गात आहे. )

**या, धावा पावा आज यदुराया । विनवूं किती तुज सदया ॥ ध्रु० ॥ सागर सगळा खवळुनि गेला । धीर मुलीला तिळभर नुरला ॥ १ ॥ धाउनि सखया करिं धरि बाला । पैल थडीला झडकरि न्याया ॥ २ ॥**

**सरस्वती**—मैनावन्स, इश्श ! इतक्या काय विणण्यांत गढला आहांत अगदीं बोला तरी माणसाबरोबर !

**मैना**—अं ! काय म्हटलंस वहिनी !

**सरस्वती**—म्हटलं, बोलत कां नाहीं तुम्ही आज ? कांहीं तरी बोला. विणण्याचं निमित्त करून मनांतल्या मनांत विचारमग्न आहांत. कांहीं होतय का! बरं कां वाटत नाहीं! कां लग्नाची काळजी लागली आहे!

**मैना**—मला ! आणि लग्नाची काळजी ! इश्श ! मी कशाला लग्नाची काळजी करूं !

**सरस्वती**—मी तेंच म्हणतें. तुमच्या लग्नाची काळजी करायला वडील समर्थ आहेत. तुमचे बंधु पण कांहीं खटपट करीत नाहींत असं नाहीं. शिवाय यशवंत पाहून गेलेच आहेत. तें ठरल्यासारखंच आहे. मग तुम्हांला कशाला काळजी ! अन् काळजी नाहीं तर मग अशा तुम्हीं गंभीर कां !

**मैना**—गंभीर कुठली मी ? वहिनी, माझी आपलीं सूरतच वैसी !

**सरस्वती**—म्हणजे बरं. खरंच कांहीं होत नाहीं ना ? लग्नाबद्दल काळजी नाहीं ना मनाला लावून घेत ?

**मैना**—पण मी लग्नाची काळजी करू कशाला ? माझ्या आईनं मरतांनाच मला आशिर्वाद देऊन ठेवला आहे कीं, मैने, तुझं लग्न चांगलं होईल. नवरा मनासारखा मिळेल. तुला मुलंबाळं पुष्कळ होतील. तुझा संसार थाटाचा होईल. अन् आईच्या या शेवटच्या आशिर्वादावर माझा पक्का भरंवसा आहे. आपल्या हांतून कुणाचं तरी धडभलं घर व्हायचं हें ठरलेलंच आहे.

**सरस्वती**—मी सांगतें मैनावन्स तुम्हांला. तुम्ही यशवंतरावाचं घर धडभलं करणार आहांत; हो पण वन्स, बरी गोष्टीवरून गोष्ट निघाली. मी तुम्हांला विचारणार होतें, खरंच तुम्हांला यशवंत आवडले आहेत का हो ? खरं सांगा हं ?

**मैना**—माझ्या आवडीनिवडीवर आहे काय पण ? मी दुसऱ्याला आवडण्यावर सर्व कांहीं आहे ! मी पसंत पडलें असलें म्हणजे झालं.

**सरस्वती**—म्हणजे? तुमच्या मनाचा विचार तुम्हीं करीत नाहींच का ?

**मैना**—आम्हीं नाहीं बाई असा शहरांतल्या शिकलेल्या मुलीसारखा विचार करीत ! लग्न झालं कीं आम्हांला पति आपोआपच आवडायला लागतो आणि आमच्या वागण्यासवरण्यानं आम्हीं पण आपल्याला आवडत्या करून घेतों.

**सरस्वती**—असं कसं होईल ? ही तुम्ही मुलखावेगळींच रीत सांगतां !

**मैना**—मुलखावेगळी नाहीं. अगदीं खास मुलखांतलीच आहे. शहरांतल्या शिकलेल्या शहाण्या मुलींची बरीक निराळी रीत असते. आपल्याला नवरा असाच मिळेल का तसाच मिळेल ? तो आपल्याला आवडेलच

का ! तो आपल्याला सुखांत ठेविलच का ! वहिनी, मी म्हणतें, हें सगळं आपल्या वागण्यावर आहे. आम्हीं एवढं पाहातों, मनानें दणकट, शरीरानें बळकट, कामाला खंबीर, हंसतमुख आणखी माणुसकी ओळखणारा असा पति आम्हां बायकांना चट् आवडायला लागतो.

**सरस्वती**—मग काय, असे गुण यशवंतांत आहेत म्हणतां !

**मैना**—तें मी आतांच काय सांगूं ! लग्न झाल्यावर कळेल तें मला.

**सरस्वती**—म्हणजे तुमचं म्हणणं असं कीं तुम्हांला पति असा मिळावा अशी तुमची इच्छा आहे आणि मिळेल अशी खात्री आहे.

**मैना**—हो, आणि म्हणूनच मी निर्धास्तही आहें ! ( घंटा वाजते. )

**सरस्वती**—सदू, अरे सदू ( सदू गडी येतो. ) अरे, बाहेर कोण आलें आहे पहा बरं ( सदू जातो व कमलसह परत येतो. ) कोण ! कमल ! तूं कां ती ! ये. परवां ना येणार होतीस तूं कायससं सांगायला !

**कमल**—ती आत्तां आलें आहें.

**सरस्वती**—ये. कांहीं हरकत नाहीं. मला आज वेळ आहे. अशी जवळ बैस माझ्या अन् काय तुला सांगायचं असेल तें खुशाल सांग. ये बैस.

**कमल**—( खालीं मान घालून विणीत असलेल्या मैनाकडे सहेतुक नजरेनें पहात ) सरूताई, मला बोलायचं आहे पण—

**सरस्वती**—बोल ना मग ! ( तिचा हेतू ओळखून ) मैनावन्स !

**मैना**—( वर मान करून ) अं ! काय !

**सरस्वती**—म्हटलं, होय, ही माझी मैत्रिण आली आहे. आम्हीं जरा बोलत बसतों—

**मैना**—बरं मग !

**सरस्वती**—तोंपर्यंत तुम्हीं चांगलासा आपल्याकरतां चहा करून आणतां का ! तुम्हांला काम सांगूं नये खरं पण—

**मैना**—( कमलकडे लक्ष देऊन व न्याहाळून ) इश्श ! वहिनी, इतकी आडपडद्यानं कशाला बोलतेस ! नीट सांग कीं आमचं कांहीं गुपीत बोलायचं आहे, तेव्हां इथून तुम्हीं जा म्हणून. तुमचीं गुपितं मला हो ऐकून काय करायचं ! ही मी चाललें पहा. चहा करतें आणि सदूच्या

हातीं पाठवितें. मी इकडे येतच नाहीं. मग तर झालं ! तुमचीं हवीं तसलीं खुशाल गुपितं चालूं देत हो. ( कमलला ) तुम्हांला नाहीं हं म्हटलं ! मी आपलं वहिनीला सांगितलं. ( जाते. )

**सरस्वती**—कमल, तिकडे काय पहात राहिलीस ? त्यांच्या बोलण्यांत हेतूबितू कांहीं नाहीं. त्यांची बोलण्याची आपली एक तऱ्हाच आहे ती! (कमल सरस्वतीजवळ येऊन बसते व एक दीर्घ सुस्कारा टाकते.) कां ग कमल ! असं कां ? तूं मधुकरांना आवडलीस. त्यांना तूं पसंत केलंस, तुमचा वाङ्‌निश्चय देखिल झाला. आता खरं म्हटलं तर तूं अगदीं सदाफुलीसारखी सदा आनंदी प्रफुल्ल असावयाचींस. ती अशी कष्टी कां ?

**कमल**—मी कष्टी कां ? ताई, आजवर तुझ्याजवळ माझं जें गुपित सांगितलं नव्हतं तें मला सांगायच आहे. त्या गुपिताचे मला कष्ट होत आहेत. ताई, मला भीति वाटते.

**सरस्वती**—वेडी कुठली ! आपलं दुःख मायेच्या माणसाजवळ सांगितलं म्हणजे तितकं हलकं वाटतं ठाऊक नाहीं का तुला ? मला तूं आपली बहीण मानतेस ना ?

**कमल**—ताई, मला अगोदर वचन दे.

**सरस्वती**—कसलं वचन ?

**कमल**—माझं गुपित कळल्यावर तूं माझ्यावर रागावणार नाहींस म्हणून ?

**सरस्वती**—नाहीं रागावणार.

**कमल**—माझा तिरस्कार करणार नाहींस ?

**सरस्वती**—भलतीच कसली शंका घेतेस ?

**कमल**—मला दूर लोटणार नाहींस ?

**सरस्वती**—कमा, तुला दूर लोटण्याइतकी कां मी कठोर आहें ?

**कमल**—माझ्या गळ्यावर हात ठेवून शपथ घे बरं !

**सरस्वती**—शर्थ झाली बाई तुझ्यापुढं कमा ! तुझ्या गळ्याशपथ—माझ्याही गळ्याशपथ—तुझं वाटेल तें गुपित असलं तरी तें ऐकून मी माझ्या कमावर कधीं कधीं रागावणार नाहीं. झालं आतां ?

**कमल**—ताई, तुम्हीं आजवर मला जशी समजतां तशी मी नाहीं. तुमच्यापासून मी माझी जात लपविली आहे ! मी शुद्ध कुलांतली नाहीं ! एका कलावतीच्या पोटीं या दुर्दैवी जीवाचा जन्म झाला आहे.

**सरस्वती**—काय ! काय म्हणतेस ! (दचकून आश्चर्यानें थक्क होऊन कमलकडे पहात रहाते. कमल तिच्याकडे पाहून मग मान खालीं घालून हुंदके देते. सरस्वती तिच्यापासून किंचित् दूर सरते.) काय ! तुझं कुल शुद्ध नाहीं ! कमल, तूं एका कलावतीची मुलगी आहेस !

**कमल**—सरुताई ! सरुताई ! आहे हें असं आहे. मी कोण तुला सारं सांगितलं आहे. ताई, माझं कुल कसंही असलं तरी मी कशी आहें हें तुला ठाऊक आहे ना ! तूं–मी इतके दिवस एका जागीं खेळलों–बागडलों, वागलों–मिसळलों, एका ताटांत जेवलों–सवरलों, तोंडांतला घांस एक-मेकींनीं दिला घेतला. एकमेकींच्या कुशींत बिलगून सुखस्वप्नांचा अनुभव घेतला–होय ना ताई ! माझं चारित्र्य तूं जाणतेस; पण ताई, मी कोण कुणाची हें कळतांच तूं माझ्यापासून दूर सरलीस, मला दूर केलंस—

**सरस्वती**—कमल, हेंच तूं मला सांगणार होतीस ?

**कमल**—होय, ताई ! मला तें सांगता येईलसं वाटत नव्हतं. पण तें सांगणं आज माझ्या आईच्या या पत्रानं सोपं केलं (पोलक्यांतून पत्र काढून तिच्या हातीं देते.) ताई, एका क्षणांत मी तुला पारखी झालें का ? माझ्या स्पर्शानं तुझ्या घरांतली वस्तून्वस्तू विटाळली आहे, बाटवली आहे, अशा नजरेनं, तूंच माझ्याकडे पाहूं लागलीस का ! माझी जात मी चोरली म्हणून तूं मला दूर लोटावंस का ? ताई, जिला तूं आजवर पाठच्या बहिणीचा मान दिलास, ज्या मायेनं वागविलंस, तिचं कुल अशुद्ध आहे, हें कळतांच त्या मायेचे बंध तडातड तोडून टाकून तूंच जर दूर सरलीस–

**सरस्वती**—नाहीं, कमल, नाहीं. मी तुला दूर लोटीत नाहीं. लोटीत होतें. क्षणभर मन चलबिचल झालं. पण हें पहा, मी लगेच तें सावरलं आहे. तुझं कुल कसंही असलं तरी तूं शीलानं शुद्ध आहेस, तुला मी पाठची बहिण मानली आहे. तें नातं जन्मभर तसंच अढळ टेवीन. ये. अशी जवळ ये. पूस डोळे. ही बघ तुझी बहिण पहिल्याच मायेनें तुझ्या

पाठीवरून मायेचा हात फिरवीत आहे. ( कमलचे डोळे पुन्हां पाण्यानें भरतात. ) आतां कां बरं पुन्हां डोळ्यांत पाणी !

**कमल**—ताई, तुझ्या मायेच्या हातानें हें पाणी आणलं आहे. हे सुखाचे अश्रू आहेत.

(भावगीत)

**जगताला जीव भ्याला । खरा निवारा । मला दे-घे कुशीला ॥ ध्रु० ॥ सांग तुजविना, पुसलें नयना कुणि माझ्या ? आला सुखाला उमाळा ॥ १ ॥**

मी कोण हें कळल्यावरही तुझ्या मायेचा आधार जसा आतां मला मिळाला, तसाच ताई, त्यांचा अनुभव मला येईल का ग !

**सरस्वती**—त्यांचा कुणाचा ! हं ! मधुकरांचा म्हणतेस ! त्यांना तुझी हकीकत माहित नाहींच का ?

**कमल**—नाहीं. त्याचं अगोदर मला महत्वच वाटलं नाहीं. पण माझे डोळे आईनं या पत्रानें चांगलेच उघडले. आतां माझी हकीकत त्यांना कळलीच पाहिजे.

**सरस्वती**—ती कशी कळवणार तूं ?

**कमल**—तेंच तर ब्रह्मांड संकट माझ्यावर आलं आहे.

**सरस्वती**—पण कळलं तरी त्यांचं तुझ्यावर प्रेम आहे—

**कमल**—मनोराज्यांतल्या प्रेमाला, व्यवहारांत काडीची किंमत नसते असं आई म्हणते.

**सरस्वती**—पण मधुकरावर तरी तुझं खरं प्रेम आहे ना !

**कमल**—तें तरी ठरवायचं कुणी ! त्यांनींच ना ! मी लबाडीनं वचनांत गोवून, मग त्यांना आपली खरी स्थिती सांगितली असं आतां होणार आहे.

**सरस्वती**—म्हणजे विषाची परीक्षाच आली म्हणायची !

**कमल**—अन् हा धोंडा माझ्या पायांवर मूर्खपणानं मीच पाडून घेतला आहे.

**सरस्वती**—आतां या पेचांतून तूं पार पडणार कशी !

**कमल**—तेंच मी या माझ्या ताईला विचारायला आलें आहें ना!

**सरस्वती**—वस्तुस्थिती कळल्यावरही मधुकर तुझ्यावर पहिलंच प्रेम दाखवतील असं तुला वाटतं का!

**कमल**—मला आतां कशाचाच विश्वास वाटेनासा झाला आहे.

**सरस्वती**—मग मधुकरांना तूं कसं विचारणार!

**कमल**—माझ्याकरितां माझ्या ताईनंच ते विचारलं पाहिजे.

**सरस्वती**—मी विचारीन. पण भ्रमाचा भोपळा फुटला तर! तुझी प्रेमनिराशा झाली तर!

**कमल**—जें खरं प्रेमच ठरणार नाहीं त्याची निराशा ती काय व्हायची!

**सरस्वती**—मग तूं काय करणार!

**कमल**—आईच्या आज्ञेप्रमाणं दुसऱ्या एखाद्या तरुणांपुढं माझ्या आयुष्याचा बाजार मांडून त्यांना काकुळतीनं विनवीन कीं, माझ्यासारखी मोडक्या बाजारांतली कलंकीत बाहुली स्वीकारायला आपण तयार व्हाल काय! पण ताई, ज्यांनीं न कळतां माझा स्वीकार केला आहे त्यांनीं तोच कळून केला तर माझ्या इतकी भाग्यशाली मीच ठरणार आहें. म्हणून म्हणतें ताई—

**सरस्वती**—बरं आहे. याच प्रसंगानं बायकांवरील पुरुषांची प्रेमाची बड-बड कसोटीला तरी लागेल. तूं कांहीं काळजी करूं नकोस. मधुकरांना भेटून चिडवीन, चढवीन आणि त्यांच्या मनाचा ठाव काढीन. अग, आपल्या जन्माचा जोडीदार असा हडसून खडसून ठरलेलाच चांगला नाहीं का!

**कमल**—ताईनं एवढा धीर दिल्यावर मला आणखी काय हवं! ताई, तुला हेंही सांगून ठेवतें.माझ्या दोषांसुद्धां पहिल्या इतक्यांच आनंदानें त्यांनीं माझा स्वीकार केला तर मी पण आमचा संसार आदर्शासारखा करून दाखवीन. मग करशील ना माझ्याकरतां खटपट!

**सरस्वती**—पुन्हां पुन्हां मला हें काय सांगतेस! तुझी जिम्मेदारी मी घेतली असं एकदां तुला सांगितलं आहे ना!

**कमल**—मग यतें तर.

**सरस्वती**—जातेस! बरं. होईल तसं कळवीन तुला मी.

**कमल**—देव तुझ्या हाकेला उभा राहूं दे. जातें मीं, पण ताई, माझ्याबद्दल तुला आतां चमत्कारीक वाटत असेल नाहीं !

**सरस्वती**—छेः ! आतां तर तूं मला पहिल्यापेक्षां जास्त आवडायला लागलीस. ( कमल जाते. दुसऱ्या दारानें थोड्या वेळानें गजानन येतो. )

**गजानन**—छेः ! छेः ! छेः ! शिकस्त झाली लोकांच्या पाजीपणापुढं. सुशिक्षित लोक हलकट कसे असतात, संभावित माणसं बिनदिक्कत लुच्चेगिरी कशी करतात, साळसूदपणाचें सोंग सैतान कसं आणूं शकतो ! कांहीं, कांहीं कळत नाहीं. आपली अक्कल गुंग झाली; कोणावर विश्वास ठेवावा आणि कोणावर ठेवूं नाहीं याचीसुद्धां पंचाईत होऊन बसली आहे.

**सरस्वती**—कुणासंबंधानं हें सगळं चाललं आहे ? काय झालं ?

**गजानन**—व्हायचं काय? नेहमीचंच झालं आहे. एखाद्याचे बरें करायला जावें आणि त्यानें नेमक्या माझ्याच गळयांत तंगड्या आणाव्यात.

**सरस्वती**—हा तर रोजचाच रोजगार आहे. मी नेहमींच सांगतें.

**गजानन**—पण तें तुझं सांगणं मी ऐकत नाहीं. पहिलंच वळण गिरवतों आणि त्याचा त्रास हा असा होतो.

**सरस्वती**—कुणी त्रास दिला इकडे ?

**गजानन**—माझ्या स्नेह्यासोबत्याशिवाय मला कोण त्रास देणार ?

**सरस्वती**—पण इकडे त्रास देणारे इकडचे असे स्नेहांकित तरी कोण ?

**गजानन**—दुसरा कोण ? तो मध्या! पाजी, नीच, डाकू, हरामखोर ! त्याला मी आपला स्नेही म्हणवला आहे ना ? तो मला आपला स्नेही म्हणवतो ना ? मोठेपणानं त्याच्या लग्नाचा पुढाकार मी घेतला आहे कीं नाहीं ? त्याचं प्रायश्चित तो मला देणारच.

**सरस्वती**—मधुकरांनीं काय केलं आणखी ?

**गजानन**—आणखी दुसरं काय करणार कपाळ ? गळेकापू, लबाड ! हे लेकाचे देवालासुद्धां हातोहात फसवायचे. मंगलकार्याला गजाननाची पूजा करून आव्हान करायचं आणि त्याच्याच हातानं अमंगल कार्य उरकून घ्यायचं, ही या लोकांची कारवाई. आपली पोळी पिकवण्याकरतां दुसऱ्याच्या घराची होळी करावयाची या लोकांची तयारी !

**सरस्वती**—पण काय झालं ते नाहीं का सांगायचं ?

**गजानन**—तेंच तर तुला सांगतों ना ! पक्का बदमाष, पुरा हलकट ! दिसायला गोरा पण काळजाचा कोळशापेक्षां काळा. आमच्याबरोबर इतके दिवस वागतो आहे पण लेकानं कधीं आम्हांला एका अक्षरानं दाद लागूं दिली नाहीं. सरू, मध्या किती अधम आहे याची तुला जरा तरी अटकळ आहे ? तो कोण आहे याची थोडी तरी कल्पना आहे ? कुठून असणार ! जिथं माझी मती गुंग झाली तिथं तुझा काय पाड ? मघाशीं मी फिरायला गेलों. वाटेंत सावंतवाडीचा आपला तो हा—तो भेटला. मध्या सावंतवाडीचाच. लवकरच घडून येणाऱ्या मध्याच्या प्रीति-विवाहाची हकीकत त्या स्नेह्याला सहज सांगितली. त्यानं मुलीबद्दल चौकशी केली. मी मोठ्या प्रौढीनं सांगितलं हा कोकणस्थ—कऱ्हाडे संबंध होतो आहे. मी यांत पुढाकार घेतला आहे. तेव्हां त्या माणसानं सांगितलं—

**सरस्वती**—काय सांगितलं ?

**गजानन**—तेंच सांगतों ना ! त्या स्नेह्यानं मध्याचं सारं काळेंबेरं सांगितलं. तो मला म्हणाला मध्याला तुम्हीं कोकणस्थ समजतां काय ? मी म्हटलं होय ! तो म्हणाला नाहीं. मध्या कोकणस्थ नाहीं ! मी म्हटलं मग तो कोण आहे ? त्यानं सांगितलं—अगदीं स्वच्छ सांगितलं—कीं मध्या अस्सल कोंकणस्थाचा बच्चा नसून दासीपुत्र आहे ! त्याची आई गाणारीण आहे. सावंतवाडी दरबारांतून तिला तनखा आहे. त्याच्या आईचं नांव गंगासानी ! अशी आहे त्याची हकीकत ! आतां तूंच सांग. आहे कीं नाहीं तो हरामखोर ! आमच्या मध्यस्थीनं आम्हांला पुढें करून एका चांगल्या कुळांतल्या ब्राह्मणाच्या पोरीचा गळा कापायचा रचला आहे कीं नाहीं डाव त्यानं ? आतां काय, आमच्या या घरांत त्या नटकीच्या कार्ट्याच्या गळ्यांत कमलसारखी कुलवंताची पोरगी मी बांधूं ! या मंगलभुवनांत मी हें अमंगल कार्य घडवून आणूं ! आतां भेटूं दे त्या नटकीच्या कार्ट्याला म्हणजे असा झाडतों त्याला. ह्या हलकटांना चांगल्यांच्या पोरी पाहिजेत काय?

**सरस्वती**—( आनंदानें ) त्यांची ही हकीकत खरीच कां खरी आहे ?

**गजानन**—मग काय तुला खोटी वाटते ? प्रत्यक्ष सावंतवाडीच्या

माणसानं, मध्याच्या शेजाऱ्यानं सांगितली ना! तो खोटं कशाला सांगेल!

**सरस्वती**—मग बरं झालं बाई! अगदीं छान झालं! देवच पावला! देव करतो तें चांगल्याकरितांच करतो म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं!

**गजानन**—म्हणजे! यांत काय देवानं कुणाचं चांगलं केलं कपाळ!

**सरस्वती**—दोघांचेंही.

**गजानन**—दोघांचं कुणाचं! तुझं माझं?

**सरस्वती**—तें पूर्वीच केलं! पण आतां मधुकरांचं आणि कमलचंही!

**गजानन**—तें कसं काय!

**सरस्वती**—तेंच सांगतें. ऐकावं. जशी मधुकरांची हकीकत आहे, तशीच कमलचीही पण आहे!

**गजानन**—काय म्हणतेस? म्हणतेस काय!

**सरस्वती**—खरंच! मधुकर सांवतवाडीच्या गंगासानीचे चिरंजीव तर कमल बेळगांवच्या तुळसाबाईची कन्या! तिनं मला आतांच सांगितलं! बिचारीनं सारी हकिकत सांगितली नी रडरड रडली. आणखी मधुकरांना हें कळलं तर आपला स्वीकार ते कसा करतील म्हणून तिला एकसारखी धास्ती वाटत आहे!

**गजानन**—हु:श्श! हरे रामराम! म्हणजे अगदीं सुटलों म्हणायचें! हो, नाहीं तर आमच्या बोडक्यावर पाप! आतां दोघेही खड्डयांत पडा म्हणावं! आमचं कांहीं बिघडत नाहीं! आतां आपल्याला त्यांचा संबंध नको! जा म्हणावं कुठंही आणि मरा—

**सरस्वती**—इश्श! तसं कसं होईल! मधुकर असे आहेत हें कांहीं कमलला माहीत नाहीं.

**गजानन**—आणि कमल अशी आहे हें मध्याला तरी कुठं ठाऊक आहे! म्हणूनच म्हणतों मरू दे आतां त्या दोघांना!

**सरस्वती**—असं अंगावेगळं टाकून कसं चालेल! कमलनं मधुकरांना आपली हकीकत सांगण्याचें काम मला मागितलं आहे. सांगून, त्यांचं मन वळवून शेवटपर्यंत हें तूंच घडवून आण म्हणून मला गळ घातली आहे. मी तें कबूल केलं आहे. मग नको का आपणच हें शेवटाला न्यायला!

**गजानन**—पण ब्राह्मणाची पोरगी उपटायला टपलेला तो बोका कमलची खरी हकीकत कळल्यावर तिचा स्वीकार करील असं वाटतं तुला?

**सरस्वती**—तर मग कसं करायचं?

**गजानन**—ठीक आहे. ठरलं. सुचली युक्ति. आतां असंच करायचं. कमलची हकीकत नाहींच त्याला सांगायची. तिची इच्छा मनापासून त्याच्याशींच लग्न करायची आहे ना? आपण त्याच्याच गळ्यांत कमलला बांधणार! त्याची खोड अशीच मोडली पाहिजे. गांठ पडल्यावर त्याला झाडणार होतों पण आतां तो बेतच रद्द! पुढें त्रास होऊं नये म्हणून अगोदर आपली हकीकत कळावी अशी कमलला जशी इच्छा आहे तशी मध्याला खात्रीनं असणार नाहीं. तेव्हां त्याला तसाच राहूं दे. लग्न लागल्यानंतर कळलं तर काय होणार आहे!

**सरस्वती**—आपल्याला योग्य दिसेल तें आपण करावं. कमलची इच्छा आपल्याला नंतर त्रास होऊं नये एवढीच आहे.

**गजानन**—छे:! तें उपयोगीच नाहीं. कमलची हकीकत कळली तर लगेच तो लेकाचा तिचा नाद सोडील आणि दुसऱ्या एखाद्या चांगल्याच्या पोरीला जाळ्यांत अडकविण्याच्या नादाला लागेल; त्याला तशी संधि मिळतांच उपयोगी नाहीं. तेव्हां कमलची हकीकत आतां सक्तिनें गुलदस्तांतच ठेवायची! तिला वाटेल तर—पण नको—तिनेंसुद्धां कांहीं बोलूं नये. तो तिला झुलवतो आहे तसंच लग्न लागेपर्यंत तिनेंही त्याला झुलवलाच पाहिजे.

( पडद्यांत **हणमंतराव**—याहो, आलांच आहांत घरांपर्यंत तर आंत येऊन चला. काय हरकत आहे! नाहीं म्हणतां! मुंबईहून परत आल्यावर म्हणतां! बरं. तरी हरकत नाहीं! तुमच्या मर्जीप्रमाणं. बाकी आतां आला असतां म्हणजे आत्तांच उरकून गेलं असतं एक काम! फार नाहीं वेळ घेत आम्ही आपला.)

**गजानन**—हणमुकाका आले वाटतं सर्व शाळाकॉलेजं धुंडाळून! आल्यापासून त्यांना तो एक नादच लागला आहे.

**सरस्वती**—बरोबर कोण कीं आणलं आहे वाटतं आणखी!

**गजानन**—(हणमंतराव येतात.) झाली शाळाकॉलेजं पालथी घालून ? बरोबर कोण आलं होतं ? कुणाशी बोलत होतां ?

**हणमंतराव**—तो का ? अरे तो—तुझा स्नेही मधुकरपंत ! आलों आम्ही इथपर्यंत. म्हटलं चल घरांत ! पण नाहीं म्हणाला. मुंबईला जाणार आहे वाटतं तो ! परत आल्यावर येईन म्हणाला. मी म्हटलं बरं. (सरस्वती आंत जाऊं लागते.) कां सूनबाई, निघालीस का ? तुम्हांला आनंदाची खबर सांगणार आहें. ये परत ये. (सरस्वती परत वळते.)

**गजानन**—या सरुताई, परत या.

**हणमंतराव**—अरे लेकाच्यो ! हें रे काय ! अरे, तुम्ही नवराबायको कीं बहिणभाऊ ? गजाभाऊ, अरे बायकोला ताई म्हणतोस ? हात्तुमची ! मी समजत होतों कांहीं बाळबोध राखलं आहेस ! पण पहातों तों तुमचाही मसुदा नवाच !

**गजानन**—(दोघें हंसतात. सरस्वती मान खालीं घालते) हणमुकाका, चुकलंच तें. बरं काय आनंदाची बातमी आहे ती सांगतां ना ?

**हणमंतराव**—हो आनंदाची खबर सांगायची नाहीं का ? हं ! अरे पोरीकरतां आज आपण वर पसंत करून टाकला बरं का ? दोन दिवस शाळाकॉलेजं धुंडाळलीं पण कांहीं उपयोग झाला नाहीं. आज मनासारखं झालं; अगदीं मनपसंत झालं.

**गजानन**—म्हणजे ? यशवंतच ना पसंत केलांत शेवटीं ?

**हणमंतराव**—छट् ! तुझ्या यशवंतांत कांहीं अर्थ नाहीं. त्याच दिवशीं त्याचा नूर मी ओळखला.

**सरस्वती**—मग दुसरा कोण ?

**हणमंतराव**—दुसरा ? अरे, तुमचा मधुकरपंत ! मधुकराला जामात निश्चित केला. ठरवून टाकला !

**गजानन**—(सरस्वती व गजाननराव परस्परांकडे पहातात.) काय ? हणमुकाका, मधुकराला जांवई ठरवलांत ? मधुकर ? मधुकर जांवई ?

**हणमंतराव**—तूं यशवंताला आणलंस आणि मधुकराला विसरलास ! कां ठीक झालं कीं नाहीं ? गोरा आहे, एल् एल्. बी. आहे. लेखक,

नाटककार व टीकाकार आहे. जसा असावा तसा आहे कीं नाहीं बोल ?

**गजानन**—मुळींच नाहीं. मधुकर तुमचा जांवई व्हायला मुळींच लायक नाहीं. त्यांचं तुमचं जमायचं नाहीं, पटायचं नाहीं आणि त्याच्या भानगडींत तुम्हीं पडूंही नये.

**हणमंतराव**—का रे बाबा ? अरे, माझं त्याचं जमतंय, पटतंय आणि मी त्याच्या भानगडींतही पडून चुकलों आहें.

**गजानन**—आतां काय सांगूं तुम्हांला हणमुकाका ?

**हणमंतराव**—मधुकराविरुद्ध कांहीं सांगूं नकोस.

**गजानन**—अहो, पण त्याचं दुसरीकडे जमलं आहे.

**हणमंतराव**—मुळींच नाहीं. जमायचें चाललें होतें. पण वशिल्याच्या माणसाला जशी अगोदर नोकरी मिळते तसं मी केलं आहे. हा व्यवहार आहे आणि तो आपण केलाच पाहिजे !

**गजानन**—पण मैनाताईच्या जन्माचं मी असं मातेरं होऊं देणार नाहीं.

**हणमंतराव**—कां ? तुझ्या यशवंताच्याच गळयांत तिला बांधून तुला मित्रऋण फेडायचं आहे म्हणून ?

**गजानन**—अरेरे ! हणमुकाका, काय हा भलताच गैरसमज !

**सरस्वती**—मैनावन्संनीं यशवंतांनाच पसंत केलं आहे. त्यांच्या आवडीनिवडीकडे नको का पहायाला ? त्या आतां मधुकरांना कशा पसंत करतील ?

**हणमंतराव**—तिचा बाप पसंत करील ! कशा पसंत करतील म्हणे ! त्या गमजा माझ्यापुढें चालावयाच्या नाहींत !

**गजानन**—हणमुकाका, तुम्ही काय वाटेल तें म्हणा पण मी मैनाताईला त्या ठिकाणीं मुळींच देऊं देणार नाहीं.

**हणमंतराव**—अरे पोरगी माझी कां तुझी ? अमक्या ठिकाणीं द्या आणखी तमक्या ठिकाणीं देऊं नका म्हणून तूं रे कोण मला सांगणार ?

**गजानन**—पण माझ्याइतकी मधुकराची माहिती तुम्हांला नाहीं. तो कोण आहे, कसा आहे, व कोणत्या खोड्यांत तुम्हांला घालील याची तुम्हांला कांहीं कल्पना आहे का ?

**हणमंतराव**—सर्व कांहीं आहे. मला तूं अगदींच हा समजूं नकोस. मी तुझ्यापेक्षां त्याला जास्त जाणतों. तुला तारतम्य नाहीं. मी कसा झालों तरी तुझ्यापेक्षां चार पावसाळे जास्त पाहिलेला आहे, समजलास ! आतां माझं ऐक. माझ्यापुढें वादंग घालूं नकोस. तूं आपल्या त्या यशवंतकरतां धडपडतो आहेस हें मला माहीत आहे. पण त्या लेकानं काय दिवे लावले? पुन्हां आला तरी का कळवायला एका शब्दानं !

**गजानन**—( सदू गडी एक चिठ्ठी आणून देतो. ) कुणाची चिठ्ठी ! यशवंतरावाची ! हणमुकाका, ही पहा यशवंताची चिठ्ठी. त्याचा निकाल ऐकल्याशिवाय तरी तुम्हीं दुसरा विचार करणं बरं नव्हे.

**हणमंतराव**—वाच काय म्हणतो तो तें.

**गजानन**—( चिठ्ठी वाचतो. ) "प्रिय मित्र गजाननराव, कळविण्यास दिलगीरी वाटते कीं आपण दाखविलेली मुलगी मला स्वीकारतां येत नाहीं. मुलगी वाईट म्हणून नव्हे पण माझा प्रीतिविवाह दुसरीकडे जमल्यासारखा आहे. म्हणून खरी गोष्ट ध्यानांत घेऊन मला क्षमा कराल व माझ्या होणाऱ्या प्रीतिविवाहाला मित्रप्रेमानें पाहिल्या इतक्याच आनंदानें सहाय्य कराल अशी खात्री आहे. कळावें आज विशेष लिहीत नाहीं.

आपला नम्र—यशवंत".

**हणमंतराव**—झालं ! पाडला उजेड तुझ्या यशवंतानें ! पाडलं तुला तोंडघशीं ! आतां बोल. मधुकराबद्दल विचार केलाच पाहिजे कां नको !

( गजाननराव हताश उभा रहातो. सरस्वती दिग्मूढ उभी रहाते. हणमंतराव कपडे काढीत संध्या करण्याकरितां आंत जातात. )

## पहिला अंक समाप्त

# अंक २ रा



## प्रवेश १ ला

( **यशवंताची खोली**–यशवंत व गजानन. )

**यशवंत**—( घंटा ऐकून दार उघडण्यासाठीं जात ) यस्, यस्, कम इन. ( दार उघडतो. दारांत गजाननराव दिसतात; त्यांना पाहून खट्टू होऊन ) कोण ! गजाभाऊ ! तुम्हीं इकडे ? या, या, मला वाटलं कीं—

**गजानन**—काय वाटलं तुला ? माझ्याशिवाय दुसरं कोणी तरी आहे ? दुसरं आत्तांच येणार होतं? येणार आहे वाटतं ? हं, दिसतंच आहे. इथल्या एकंदर थाटामाटावरून दिसतंच आहे ! बाकी, मी आलों तों आकस्मिकच आलों आहें. ठरवून आलों नाहीं कीं कळवून आलों नाहीं ! कां यशवंत, माझ्या या वेळच्या येण्यानं तुझ्या कार्यक्रमांत विक्षेप तर आला नाहीं ना कांहीं ?

**यशवंत**—छेः छेः तसं कांहीं नाहीं !

**गजाजन**—तसं नाहीं ना कांहीं ? हो म्हणजे बरं. नाहीं तर असं व्हायचं, तूं एखाद्या देवीची आराधना करावीस आणि तुला एखादा म्हसोबा प्रसन्न व्हावा ! तूं प्यायला पीयूष मागविलं असावंस आणि तुझ्या हातीं कुणी तरी एरंडेलची बाटली आणून द्यावी. तूं आपल्या प्राणवल्लभेची प्रतीक्षा करावीस आणि तिच्या ऐवजीं तुला पोलीसच मुलाखत द्यायला यावा. कां हंसलास ? यावरून मी म्हणतों तसाच बहुधा प्रकार असावा ! कोण येणार आहे रे ? अं ? हें पहा; लाजलास, गोरामोरा झालास, खालीं पाहूं लागलास, आंवढा गिळलास, कोरडया पडलेल्या ओंठावरून जीभ फिरवलीस ! खात्रीनं तुझी आराध्य देवताच इथें येणार असली पाहिजे. होय ना ? खरं आहे ना मी म्हणतों हें ?

**यशवंत**—खरं आहे. मी तिचीच वाट पहात आहें.

**गजानन**—बरं झालं बोवा! मी तरी तुझं अभिनंदनच करायला आलों होतों. अनायासानें आतां तुम्हां दोघांचंही अभिनंदन करायला मला मिळेल. तुझी प्रीतीदेवता मला पहावयालाही मिळेल. तूं बोलावलं नाहींस तरी मुद्दाम मी होऊनच आलों. म्हटलं, नाहीं आमची मैनाताई स्वीकारली तर नाहीं. प्रीतीविवाहाचा जर सुयोग असेल तर मैनाताईचा फांस तुझ्या गळ्याला आपण तरी कशाला लावा! (यशवंत सहज खिडकीबाहेर पहातो.) कां! आली वाटतं तुझी ती! (नीट सांवरून बसतो.) आपणही व्यवस्थित बसलं पाहिजे.

**यशवंत**—(बाहेर व घड्याळांत पाहून) छेः! कुणीच आलं नाहीं; आणि मला वाटतं आतां येणारही नाहीं!

**गजानन**—अरेरे! कां! माझा अपशकून झाला कीं काय!

**यशवंत**—अपशकून कसला! रोजचंच आहे हें! चार दिवस झाले—

**गजानन**—म्हणजे! तूं चार दिवस वाट पहातो आहेस! वेळ ठरवून ठेऊन ती येत नाहीं! आली नाहीं! तुमची तशी एंगेजमेंट ठरली आहे ना! मग!

**यशवंत**—छेः छेः! तसा कांहीं प्रकार नाहीं. याच सुमाराला ती यावी असा माझा अंदाज होता-आहे. सहज बोलण्यावरून मी तें अंदाजलें होतं.

**गजानन**—अस्सं! एकूण तुमचं दोघांचं तसं अजून नक्की कांहींच बोलणं चालणं नाहीं. एंगेजमेंट नाहीं. ठराव, वचन नाहीं. तूं आपल्या मनाशींच मनोराज्य करीत आहेस कीं, जसं कांहीं तुमचं ठरल्यासारखंच आहे! तिच्या अंतःकरणाचा ठाव अजून तुला कांहींच लागला नाहीं. असंच ना!

**यशवंत**—तसंही म्हणायला कांहीं हरकत नाहीं. चार दिवस एकसारखं मला झुलवलं आहे, कल्पनेवर तरंगायला लावलं आहे त्या अर्थी—

**गजानन**—जन्मभरही ती तुला असाच झुलत-तरंगत ठेवणार, असं म्हणायला कांहीं हरकत नाहीं, असंच ना!

**यशवंत**—असंच कांहीं मला अजून वाटत नाहीं.

**गजानन**—काय रे यशवंत, पाण्याबाहेर काढलेल्या माशासारखा जिच्याकरतां तूं तळमळतो आहेस, ती तुझी हृदयाची राणी कोण, कुठली, मला एकदां कळूं दे तरी ! समक्ष भेटीचा सुयोग नाहीं तर नाहीं— निदान माहिती ! दुधाची तहान ताकावर ! काय ? ( दोघांचें लक्ष टेबलावरील कमलच्या बस्टकडे जातें. ) काय ? अं ? असं ! म्हणजे ही कमल का तुझी आराध्यदेवता ? भले शाबास ! यशवंत ! आहे बुवा ! अरे, माझ्या हें ध्यानांतच आलं नाहीं ! कमल तुझ्या हृदयाची स्वामिनी ! आहे ! टीक आहे ! कमलवर कुणीही प्रेम करावं अशीच ती आहे यांत शंकाच नाहीं. तुझ्या प्रेमाचा विषय तर झकास आहे. त्यांत नांव ठेवायला काडीची जागा नाहीं. मग बरोबर आहे. अगदीं बरोबर आहे—

**यशवंत**—( न समजून ) काय बरोबर आहे ?

**गजानन**—तूं आमच्या मैनाताईला नाकारलंस तें ! अगदीं बरोबर आहे. कमलपुढें ती कुठल्या झाडाचा पाला ? तिच्याशीं लग्न केलं असतंस तर हणमुकाकांच्या पैशानं तुला विलायतची सफर घडली असती, नोकरी-धंद्याचं बस्तान बसेपर्यंत सर्व प्रकारची मदत त्यांच्याकडून तुला मिळाली असती; मैनाताईनें सुग्रणपणानें तुला सुखाचा संसार करायला भाग पाडलं असतं, स्वतःचा संसार संभाळून आल्या अतिथा मूठभर घालण्याची संधि तुला मिळाली असती! पण छेः! त्यांत काय अर्थ ! तो सारा नीरस, निष्प्रेम मामला ! कमलच्या प्रेमाच्या सहवाससुखाची गोडी त्याला कशी येणार ?

**यशवंत**—मैनाला नाकारल्याबद्दलच्या रागानें आपण बोलतां आहांत. पण गजाभाऊ, त्याबद्दल मी आपली क्षमा मागितली आहे आणि आतांही आणखी मागतों. पण कृपा करून आपण गैरसमज करून घेऊं नका. मैना नापसंत आहे म्हणून नाकारली नसून—

**गजानन**—कमलच्या प्रेमांत गुरफटल्यामुळें नाकारली आहेस; कबूल आहे मला हें ! आणि मी रागावलों आहें हें तुला कुणी सांगितलें ? तूंही असा गैरसमज करून घेऊं नकोस. मैनाबरोबर तुझं लग्न झालं असतं तर आत्तांच सांगितल्याप्रमाणें तुझा संसार सर्व प्रकारानें सुखाचा झाला असता ह्याच हेतूनें मी तो योग घडवून आणला होता आणि माझ्या अपेक्षे-

प्रमाणें तुला ती पसंत आहेच! तूंही मैनाला पसंत झालास. पण हें तुला लक्षांत घेण्याची गरज नाहीं! कारण तुझं प्रेम कमलवर! आणि कमल तिकडे मधुकराकरतां तडफडते हें तरी तूं लक्षांत घेण्याचं कारण? कमल करतां तूं झुरतोस, मधुकराकरतां कमल तळमळते! मैना मिळाल्यास पहावी म्हणून मधुकर विचार करतो, तर मैनाताईला, यशवंत मिळाल्यास आपण थाटाचा संसार मांडूं अशी सुखस्वप्नं पडतात. एकूण काय? प्रेमाचं चक्र असं फिरत आहे आणि त्या प्रेमाच्या चक्रांत तुम्हीं सारेजण असें भ्रमतां आहांत!

**यशवंत**—इतका वेळ भ्रमल्यासारखं झालं नव्हतं पण गजाभाऊ, तुम्हीं आतां भ्रमावयाला लावलंत खरं!

**गजानन**—वाः! मी रे कशाला तुम्हांला चक्रावर घालूं? तुम्हीं अगोदरच आपखुषीनें त्या चक्रावर आहात. मी फक्त त्याची जाणीव दिली इतकेंच! बरं पण, काय रे यशवंत, तूं कमलच्या प्रेमाकरतां गळ टाकून बसला आहेस खरा पण तुझ्या गळाला मासा लागलाच नाहीं तर रे?

**यशवंत**—पण तसं होणारच नाहीं अशी माझी समजूत आहे.

**गजानन**—समजूत आहे! म्हणजे खात्री नाहीं ना? मग खात्रीच समज. तिनं तुला कायमचं झिडकारलं, तर मग काय प्राण देणार का? ( यशवंत त्याच्याकडे रोखून पहातो. ) माझी खात्री आहे, प्राणच देणार तूं! कारण मग त्याशिवाय गत्यंतर काय तुला? निष्प्रेम जीवन कंठणार कसा तूं? तूं सांगूं नकोस. पण तुमच्या वतीनं आपले गोविंदाग्रजच सांगून गेले आहेत ना—' प्रेमाचा जहरी प्याला, नशिबाला ज्याच्या आला, मरावें लागतें त्याला ' हें असें! हें माहित आहे ना मला. होय ना? खरं ना मी म्हणतों हें?

**यशवंत**—तुम्ही थट्टेनें विचारा कीं कुचेष्टेनें विचारा. पण मी खरंच उत्तर देतों. तुम्हीं म्हणतां तें अक्षरशः खरें आहे!

**गजानन**—यशवंत! तूंच कां हें उत्तर देतोस? लाज नाहीं वाटत असें उत्तर देतांना? एक गोरीगोमटी, नटवी पोरगी मिळाली नाहीं तर जीव देणार तूं? कांहीं जिवाला शरम? एखाद्या नटव्या छेलछबेलीकरतां

अगोदर झुरून झुरून मरणाची तयारी करणाऱ्या, आणि लग्नानंतरही झिजून झिजून मरावयाला सज्ज होण्यांत सार्थक मानणाऱ्या नादान तरुणा, थू : थू : तुझ्या तोंडावर ! ( यशवंताच्या हाताला धरून पुढें ओढीत ) यशवंत, ऐक, तुम्हीं आजकालचे तरुण, असे नादान, नालायक, बेअक्कल, बेशरम झाला आहांत ! प्रेमाचे पोरखेळ माजविण्यांत तुम्हांला आयुष्याची इतिश्री वाटते ! हे एवढेंच तुम्हांला सुचतें. स्वतःच्या सुखापुढें देशाचें पारतंत्र्य वगैरे तुम्हांला जाणवत नाहीं, दिसत नाहीं, भासत नाही ! त्याकरतां प्रसंगीं मृत्यूच्या जबडयांत उडी घालण्याची मात्र तुमची छाती नाहीं ! आयुष्याचें ध्येय म्हणजे या नटव्या पोरी मिळवणं इतकेंच काय ! तुमच्या-सारख्या तरुणांनीं असल्या सुंदर तरुणी मिळविण्याकरतांच जगायचं आणि त्यांच्या पायींच मरायचं अं !

**यशवंत**—भलताच विषय काढलांत, गजाभाऊ !

**गजानन**—मला ठाऊक आहे ! पण तुझ्यासारख्या सुशिक्षित तरुणाचे प्रेमाच्या पांचटपणाचे विचार आणि त्याच्या अभावी मृत्यूला कवटाळण्याची तयारी पाहून—

**यशवंत**—पण मनासारखी बायको मिळविण्याची इच्छाच करूं नये का कुणी ! मनाप्रमाणें सुंदर स्त्री मिळाल्यानंतर प्रसन्न चित्त झालेल्या पतिपत्नींच्या हातून जास्त देशभक्ति व्हावयाचीच नाहीं अशी कां तुमची समजूत आहे ! रागाऊं नका, पण मला सांगा—

**गजानन**— चल हट् ! बायकांच्या पायांत घुटमळून प्राण देणाऱ्या नादानांच्या तोंडी देशभक्तीच्या गोष्टी शोभत नाहींत ! उगाच लांब जीभ काढून कशाला ताना झोकतोस ! यशवंत, तुझ्याबद्दल मला प्रथमपासूनच एक प्रकारचा विशेष जिव्हाळा वाटत होता आणि अजूनही वाटतो; म्हणूनच अधिकार नसतांना बोललों आणि बोलतों आहें. तुझें अभिनंदन कर-ण्याच्या निमित्तानें तुला भेटावें आणि तुझ्या अंतःकरणाचा ठाव काढावा म्हणूनच मी येथें आलों. ठाव निघाला. तूंही इतर नादान तरुणांतला एक नादान तरुण निघालास हें समजून वाईट वाटलें. माझी फार निराशा झाली ! निदान तूं तरी असा अनुभव देशील असें मला वाटलें नव्हतें.

**यशवंत**—गजाभाऊ, तुम्हीं इतक्या जिव्हाळ्यानें आणि कळकळीनें बोलतां म्हणूनच विचारण्याचें धाष्टर्य करतों. राग मानूं नका. मैनाबद्दल मला प्रेम वाटलं नाहीं, म्हणून मी तिला नाकारलं आणि कमलबद्दल प्रेम वाटलं म्हणून तिची इच्छा धरली यांत माझी चूक ती काय झाली !

**गजानन**—अलबत् चूक झाली ! एक चूक नाहीं हजार चुका केल्यास ! मैनाबद्दल तुला काय माहिती आहे रे ! आणि कमलबद्दल तरी तुला असं काय ठाऊक आहे ! ती कोण ! कुणाची ! आणि कुठली ! तिच्यांतले गुण, दुर्गुण, दोष—

**यशवंत**—तें तिनेंच आपण होऊन सांगावयाचें मजजवळ कबूल केलें आहे आणि तिच्या दुर्गुणांसुद्धां तिचा स्वीकार करीन असें मी तिला अभिवचन दिलें आहे.

**गजानन**—तितका तूं निर्लज्ज होशील ही माझी खात्रीच आहे ! ‘कामातुराणां न भयं न लज्जा !’ तिच्यांतल्या गुण-दुर्गुणांचं जाऊं दे ! पण तुझ्यांतल्या गुण दुर्गुणांसुद्धां कमल तुझा स्वीकार करील अशी तुझी कल्पना आहे काय ! तुझ्यांतले दुर्गुण, दोष—

**यशवंत**—काय माझ्यांत दुर्गुण दोष !

**गजानन**—मग काय ! तूं अगदीं निर्दोष–सद्गुणांचा पुतळा समजतोस का स्वतःला !

**यशवंत**—पण माझ्यांतल्या दोष-दुर्गुणांचा तिनें विचार करायचा आहे.

**गजानन**—पण तूं तो विचार करायला लावला पाहिजेस तिला ! तिनें जसे आपले दोष दुर्गुण सांगेन म्हटलं तसं तूं कबूल केलंस का !

**यशवंत**—नाहीं.

**गजानन**—कां नाहीं ! आतां मी सांगतों ! तुझ्यांत दुर्गुण असोत नसोत, तूं महार आहेस असं समज ! कमलकडे जा आणि सांग ‘आपण महार आहोंत आणि तुझ्यावर माझं प्रेम आहे तूं माझा स्वीकार कर’ म्हणून ! पाहूं या ती तुझा त्यानंतर स्वीकार करते का !

**यशवंत**—काय ! मी महार म्हणून सांगूं ! असं सांगितल्यावर कमल माझा स्वीकार करणार नाहीं !

**गजानन**—प्रत्यक्ष अनुभव घेऊनच पहा! तुझ्यावर खरं प्रेम असेल तर तें त्यानंतर टरेल.

**यशवंत**—स्वतःला महार म्हणविल्यावर ती मला झिडकारीलसं वाटतं!

**गजानन**—वाटतं नव्हे, खात्री आहे माझी! पण तिनें झिडकारलंच तर निराश होऊं नकोस. पहिल्या इतक्याच उत्सुकतेनें मैनाताई तुझ्या गळयांत माळ घालील.

**यशवंत**—आणि मी महार म्हणून सांगितल्यावरही कमलनें चांगलाच अनुभव दिला तर?

**गजानन**—मग खुशाल तिच्याशीं लग्न लाव! मैनाताईची प्रतिष्ठा मुळींच ठेवूं नकोस. पण सांगतों तें लक्षांत ठेव! कमल मधुकरालाच वरणार आहे. त्यानें गडबड करूं नये म्हणून त्याच्याकरतां तुझें बुजगावणें तिनें हाताशीं धरलें आहे. तिला तुझी पर्वा नाहीं, मधुकराची कदर आहे. मधुकर मुंबईहून येताच हें कोडं उलगडेल आणि तुझ्या डोक्यांत प्रकाश पडेल. आम्हांला काय! कमल तुला मिळो नाहीं तर मधुला मिळो, कुणाचंही मंगलकार्य आमच्या मंगलभुवनांत साजरं झालं तरी आम्हांला सारखंच आणि आम्हीं शरीरकष्ट करायला तयारच आहोंत. समजलास!

**यशवंत**—मधुकर मुंबईला गेला आहे तो अजून आलाच नाहीं!

**गजानन**—कमल अजून तुझ्याकडे आली नाहीं यावरूनच तूं ओळखायला पाहिजे होतंस तें!

**यशवंत**—मैनाकरतां तो द्राविडी प्राणायाम करायचा का?

**गजानन**—तसं तुला समजायला कांहीं हरकत नाहीं! मी त्याच हेतूनें अजूनही बोलतों आहें. कमलकडे जायची पाळी आली आणि तुला एकटयाला जायला धीर झाला नाहीं तर मला बोलाव! मी येईन तुझ्याबरोबर. तुझ्याकरतां वाटेल तर मी विचारीन!

**यशवंत**—चालेल. म्हणजे समक्षच दोघांचीही खात्री पटेल.

**गजानन**—अच्छा! येतों आतां. उशीर फार झाला. अधिकउण्या शब्दाबद्दल क्षमा मागतों. पुन्हा बोलावल्यास भेटेन अवश्य अं! (जातो.)

---

## प्रवेश दुसरा

(गजाननरावांचें घर-सरस्वती व सदू.)

**सरस्वती**—सदू, सदू, अरे सदू—

**सदू**—(प्रवेश करून) जी बाईसाहेब.

**सरस्वती**—कमलाताईकडे गेला होतास ?

**सदू**—जी तर. मघांच आलों नव्ह का त्यांच्याकडनं.

**सरस्वती**—मग काय म्हणाली ती ?

**सदू**—हू म्होर. हिंग आलेंच म्हनाल्या. त्या इक्त्यांत येत्याल नव्ह.

**सरस्वती**—बरं, स्वामी कुठं गेली रे ?

**सदू**—जी, बाहेर !

**सरस्वती**—बाहेर म्हणजे ?

**सदू**—तें नाहीं बा सांगतलं.

**सरस्वती**—मग काय सांगितलं तर ?

**सदू**—इक्तंच म्हनालं ! आम्हीं बाहीर जातुया ! तूं बाहेर जाऊं नग ! जर करतां मधुकरपंत आलं तर तेस्नी बसवनशान् घे.

**सरस्वती**—काय, मधुकर आले मुंबईहून ? इथं यायचे आहेत ? मैनावन्संना पहायला येणार आहेत वाटतं ?

**सदू**—असं दिसतया जनूं ! हनमुकाकांनीं मला सकाळच्या पारीच मधुकरपंताकड धाडल व्हतं नव्ह का ? मधुकरपंतबी आल्याती अन् त्येंच्या बरीं नाटक कंपनीतलं पात्रन बी आल्याती बघा !

**सरस्वती**—नाटक कंपनींतले पाहुणे ? म्हणजे ? कशावरून म्हणतोस ?

**सदू**—म्या परतक्ष पाहिलं नव्ह का ? तबला, पेटी, तंबुरा, त्येनीं आनलाया एक दोन बायाबी व्हत्या. दोन दाढीवाले बोकूडबी बघितलं ! तवा मधुकरपंत नव्हतं बघा ततं.

**सरस्वती**—असं म्हणतोस ? कोण बरं मंडळी असतील ती ?

**सदू**—(कमल येते तिला पाहून) ह्या बघा कमलाताई आल्या.

**सरस्वती**—ये कमा ! अगदीं कशी वेळेवर आलीस !

**कमल**—काय झालं ग ? झालं कां कांहीं मनासारखं ?

**सरस्वती**—झालं नाहीं कांहीं. पण आज कांहीं तरी होईल. मधुकर मुंबईला गेले होते तुला ठाऊकच आहे. ते आज आले आहेत आणि आत्तां इतक्यांत इथें येणार आहेत.

**कमल**—म्हणून कां मला बोलावलंस ?

**सरस्वती**—त्या करतांच तुला बोलावलं; इथं त्यांची एक गंमत तुला पहायला मिळणार आहे.

**कमल**—त्यांची गंमत ? ती कसली आणखी ?

**सरस्वती**—ती आतां प्रत्यक्षच पहा ! ती तुझ्या पथ्यावरच पडणारी आहे. तुझ्याबद्दल त्यांना कांहीं एक न सांगतां ते आपोआपच तुझ्या तावडींत सांपडणार आहेत अशी गंमत आहे. तूं आड उभी राहून ऐक म्हणजे झालं. ( घंटा वाजते. ) आलेच वाटतं मधुकर. कमा, हं, चल, पट्दिशीं त्या पलीकडच्या खोलींत शीर. बाहेर केव्हां यावयाचं तें तुझं तुलाच चांगलं समजेल. संधीचा फायदा करून घेणं तुझ्याकडे आहे. ( पुनः घंटा वाजते. ) हं, चल निघ. सदू, दार उघड जा बरं. ( कमल शेजारच्या खोलींत जाते. सरस्वती आंत जाते. सदू दार उघडायला जातो. मधुकर व सदू येतात. )

**मधुकर**—सदू, घरीं कुणींच नाहीं वाटतं ?

**सदू**—जी, बाहेर गेल्याती. येत्याल इक्त्यांत ! तुम्हास्नी बसाया सांगितलया त्येनी.

**मधुकर**—असं का ?

**सरस्वती**—( बाहेर येऊन ) कोण ? मधुकर का ? आवाज ऐकला. म्हटलं कोण आलं आहे. केव्हां आलात ? ( सदू जातो. )

**मधुकर**—मुंबईहून सकाळीं आलों. आत्तां इथें आलों. गजाभाऊ केव्हां बाहेर गेले आहेत ?

**सरस्वती**—नुकतंच बाहेर जाणं झालं आहे.

**मधुकर**—तुमच्याकडे आलेले पाहुणे गेले का परत ?

**सरस्वती**—कोण ? हणमुकाका का ? वाः ! ते कसे परत जातील ? ते तर तुमच्याकरतां मुद्दाम थांबले आहेत. त्यांची मुलगी तुम्हीं पहाणार

आहांत ना ? पसंत पडली तर तुम्हीं करून सुद्धां घेणार आहांत म्हणे ! हणमुकाकाच सांगत होते. त्यांनीं तुम्हांला पसंत सुद्धां करून टाकलं आहे. हणमुकाकांची मुलगी—आमच्या मैनावन्सं—त्यांना पाह्यलाच आला होता ना आत्तां तुम्हीं ?

**मधुकर**—पण हणमुकाका बाहेर गेले आहेत म्हणतां ना ?

**सरस्वती**—जातांना त्यांनीं मला सांगून ठेवलं आहे. तुम्हीं आलांत तर मैनावन्संना तुम्हांला दाखवा म्हणून. तसं कांहीं तुम्हांला हें वाटायला नको. मैनावन्संना मी तुम्हांला दाखवितें.

**मधकर**—तसं असेल तर मग चांगलंच झालं !

**सरस्वती**—मग आत्तांच आणूं कां त्यांना ?

**मधुकर**—काय हरकत आहे ? (सरस्वती जाऊं लागते) पण वहिनी—

**सरस्वती**—काय ?

**मधुकर**—माझं हें वर्तन तुम्हांला चमत्कारिक वाटेल. तुम्हांला कदाचित् रागही येईल.

**सरस्वती**—कां ? हं, हं, कमलाताईबद्दल कां ? त्यांत काय ? कमाताई माझीच आहे, मैनावन्सं माझ्याच आहेत. दोघींपैकीं कुणाचंही बरं झालं तरी मला हवंच आहे ! तुमचं तुम्हीं जास्त कल्याण कशांत आहे हें पाहायला समर्थ आहांत. व्यवहाराकरतां प्रेमाला पुष्कळ वेळां बाजूला सारणं भाग पडतं म्हणतात, त्यांतलंच तुमचं हें आहे.

**मधुकर**—माझी वागणूक तुमच्याजवळ ही अशी स्पष्ट आहे हें एक परी ठीक आहे.

**सरस्वती**—शिवाय आमच्या मैनावन्स तुम्हांला पसंत पडल्या तर तुम्हीं पुढला विचार नक्की करणार—तोंपर्यंत कमाताईला ह्या मधल्या भानगडी सांगणार कोण ? आणि तिला त्या कळणार तरी कशा ?

**मधुकर**—मला त्याचीच तर मुख्यतः भीति आणि काळजी आहे. बोलणार त्या तुम्हींच.

**सरस्वती**—इश्श ! मी कशी बोलेन ? मला कांहीं हें आहे कां नाहीं ? बरं, बसा जरा. मैनावन्संना मी घेऊन येतें, नाहीं तर पाठवूनच देतें.

**मधुकर**—कसंही करा. (सरस्वती जाते. मधुकर सचिंत बसतो. मैना येते. मधुकर मैनाकडे रोखून पहातो. ती मुद्दाम आडदांडाप्रमाणें वागतें.)

**मैना**—हणमुकाकांची मुलगी मी! माझं नांव मैना. तुमचं नांव मधुकरच ना! तुम्हींच मला पाह्यला आलांत ना! आलेंच अहें मी. पहा मला मग. पण आधीं माझं तेवढं काम करा. त्या फळीवर चहाचा डबा आहे, तेवढा काढून द्या अगोदर मला. पहातां काय असे! उंच आहेत, माझ्या हाताला येत नाहींत म्हणून सांगितलं. शिवाय चहा तुम्हांलाच करून आणायचा आहे. तुम्हीं पाह्यला आलां आहांत ना! मग तुम्हांला चहा नको का द्यायला? द्या तर काढून तो चहाचा डबा! हं बघतां काय! उठा चटदिशीं! (मधुकर पायाखालीं खुर्ची घेऊन चहाचा डबा काढून समोरच्या टेबलावर ठेवतो व मैनाकडे टक लावून पहातो.) आहांत; अगदीं आज्ञाधारक आहांत! माझ्याशीं लग्न झालं तर असेंच जन्मभर आज्ञेंत वागालसं दिसतं! थांबा. हा चहाचा डबा वहिनीकडे देऊन येतें चटदिशी! मग मला डोळे भरून पहा, बरं कां? (जाते.)

**मधुकर**—(डोळे ताणून आणि आ वासून पहात) अरे बापरे!

**कालिका प्रकटुनी करित चकित। बिजलि खचित कडकडे।**
**दिपत मन ॥ ध्रु० ॥ वधु अति मजा करिं करिं दुजा।**
**बघुनि मनिं नवल गमत नव। बाला ही वरिल मज काय॥१॥**

**मैना**—(समोर येऊन उभी रहाते.) हं! पहा मला आतां. नीट न्याहाळून पहा. डोळे, कान, नाक, गाल, ओठ, कपाळ, हनुवटी, दांत, (दांत विचकून दाखविते.) रंग रूप, सारं कांहीं निरखून न्याहाळून, रोखून पहा. पाहिलंत? (अंगाभोंवती फिरून) आणखी पहा, मागें, पुढें, खालीं, वर, उंचपणा, लठ्ठपणा, ठेंगणेपणा, किडकिडितपणा पहा! झालं पाहून? हं, आतां विचारा. नांव, बापाचं नांव, आडनांव, वय, शिक्षण, आवडनीवड—

**मधुकर**—कांहीं विचारण्याची आवश्यकता नाहीं.

**मैना**—कां?

**मधुकर**—हणमुकाकांच्याकडून तें सर्व कांहीं कळलं आहे मला! आतां माझ्याबद्दलच तुम्हांला कांहीं विचारावयाचं असेल तर विचारा.

**मैना**—हो, माझे काका पाण्यासारखा पैसा खर्च करून तुम्हांला माझ्याकरतां विकत घेणार आहेत; तर मला तुम्हीं कितपत उपयोगी पडाल याकरतां विचारलंच पाहिजे! मला हवा आहे तसा नोकर मिळतो आहे कीं नाहीं हें पाहिलंच पाहिजे!

**मधुकर**—मला काय आपला नोकर समजणार? वाः!

**मैना**—अर्थात्च! मग विचारूं ना?

**मधुकर**—हं. होऊन जाऊं द्या एकदां तो एक फार्स!

**मैना**—तुम्हीं एल्. एल्. बी. आहांत ना?

**मधुकर**—होय!

**मैना**—कां झालांत एल्. एल्. बी? म्हणजे असं, शहरांतून गल्लोगल्लीं शेकडों एल्. एल्. बी. पडले आहेत म्हणतात. त्यांची वकीली कांहीं चालत नाहीं, मग का झालांत तुम्ही तेंच?

**मधुकर**—पण मी सरकारी नोकरी धरणार आहें.

**मैना**—म्हणजे परक्याची गुलामगिरी पत्करणार आहांत!

**मधुकर**—गुलामगिरी खरी पण लठ्ठ पगार घरीं येईल तो?

**मैना**—असं! म्हणजे तुमचं ध्येय म्हणजे पैसाच एकूण!

**मधुकर**—ठीकच आहे!

**मैना**—काय ठीक आहे? मी का माझ्या वडिलांचा पैसा?

**मधुकर**—दोन्हीही!

**मैना**—काय हो, माझ्या वडिलांच्या पैशानें तुम्हीं विलायतची सफर करणार आहांत म्हणे?

**मधुकर**—हो; असं तर माझं ठरलंच आहे. आणि हणमुकाकांनीं तें कबूलही केलं आहे.

**मैना**—मग मलाही विलायतेला बरोबर यावें लागेल.

**मधुकर**—तें कशाला?

**मैना**—वा! तुमच्या पदरची दिडकी खर्च होणार नाहीं कांहीं! माझ्याच वडिलांचा पैसा खर्च होईल.

**मधुकर**—पण बरोबर येऊन करणार काय?

**मैना**—काय करणार म्हणजे ? माझ्या वडिलांच्या पैशाच्या खर्चानें तुम्हीं अभ्यासाचे दिवे लावणार का तिथल्या मडमांच्या भोंवती पिंगा घालीत भटकणार हें पाह्यला येणार !

**मधुकर**—जरूर ! माझं त्यांत कांहींच बिघडणार नाहीं !

**मैना**—मग पसंत आहे ना ?

**मधुकर**—वाः ! एकदम पसंत !

**मैना**—(ही-ही-ही हंसून) काय पसंत आहे ? मी कां माझं हंसणं ?

**मधुकर**—दोन्हीं !

**मैना**—अन् माझं बोलणं ?

**मधुकर**—तें पण पसंत आहे ! तें खरं असून गोड व स्पष्ट असून निष्कपटी आहे. खेड्यांतलं राहणं असून बोलण्यांत चातुर्य आहे !

**मैना**—असं ! एकूण मी तुम्हाला आवडलें तर ?

**मधुकर**—अगदीं मनापासून !

**मैना**—मग माझ्याशीं लग्न करणार तर !

**मधुकर**—जरूर !

**मैना**—कां हो ! मी तुम्हांला आवडलें म्हणजे कुणापेक्षां जास्त आवडलें?

**मधुकर**—कुणापेक्षां म्हणजे ?

**मैना**—नव्हे, म्हणजे, मी असं विचारलं कीं, तुमच्या कमलपेक्षां मी तुम्हांला जास्त आवडले का ? अगदीं खरं सांगायचं हं ! तुमची कमल जास्त चांगली आहे कां मी जास्त चांगली आहें ?

**मधुकर**—कोण कमल ? कुठली ? कोण ?

**कमल**—(खोलींतून बाहेर येते.) मी कमल ! मैनाताईच्या प्रश्नाला उत्तर द्यावं ना ?

**मधुकर**—( उभा राहून घाबरून ) कोण ? कमल ? तूं ?

**कमल**—होय ! मीच ती ! आहे का ओळख ?

**मैना**—ही तुमची कमल ! तुमचीच ना ?

**सरस्वती**—( चहा घेऊन येते. ) मैनावन्सं ! हा चहा तरी घेऊन चला ! केव्हांचा तयार करून मी तुमची वाट पहात आहें ! ( पाहून )

अगबाई ! कोण ? कमा ! कमाताई ? अन् तूं केव्हां आलीस ? ( मधुकर, कमल व सरस्वती एकमेकांकडे आळीपाळीनें पहातात. )

**कमल**—मी आलें वधुपरीक्षेला सुरवात झाली तेव्हां !

**मधुकर**—चांगलीच वधुपरीक्षा झाली !

**मैना**—अगदीं म्हणावी तश्शी वरपरीक्षा झाली !

**कमल**—अन् पुरुषपरीक्षा पण चांगलीच झाली !

**मधुकर**—छे छे छे छे ! सारा घोंटाळा झाला !

**कमल**—चांगला गळा कापला बरं ! चांगला गळा कापला !

**सरस्वती**—कमाताई, आलीस तशी चहा तरी घे—

**कमल**—कशाला ? आत्तांपर्यंत थोडी कां चहा झाली आहे येथें ? ( डोळे पुशीत ) बरं झालं ! सरूताई, छान झालं बरं का ! बरे माझे डोळे अगोदरच उघडले. आतां ज्याचा मार्ग त्याला मोकळा झाला ! सरूताई, मला आतां हें सहनही होत नाहीं आणि इथं उभंही रहावत नाहीं. जाऊ दे मला ! सरूताई, जातें मी. ( रडत, पाय आपटीत जाते.)

**मधुकर**—( गोंधळून ) कमा ! कमल ! हें पहा, थांब जरा, माझं ऐक! कमा, छेः गेलीच ही ! वहिनी, काय झालं हें ? काय करावं आतां ?

**मैना**—वाः ! बरेंच आहात कीं हो ! कमल कोण हें तुम्हाला मुळींच माहीत नव्हतं ना ? मग का अशी तारंबळ उडाली ? तिला लग्नाचं वचन देऊन माझ्या वडिलांचा पैसा पाहिल्यावर तोंडाला पाणी सुटून तिला विसरत होतां नाहीं का ? चांगलेच उलटया काळजाचे आहांत कीं ! आतां काय आ वासून पहातां ? ऐकलंत का ? माझ्या वडिलांच्या पैशाकरतां, तुम्ही मला पसंत केलं असलं, तरी मी नाहीं तुम्हांला पसंत केलं. असल्या फसव्या आणि पैशासाठीं स्वाभिमानशून्य बनणाऱ्या माणसाशीं कोण लग्न लावायला तयार होणार ?

**जा, ही कधिं ना वरील । वंचक हा ऐसा खल । दंभ कळत मज । खवळुनि नातरि नागिण डसेल ॥ ध्रु० ॥ मज गणा न भोळिखुळी । कीं असेन गाय काय ?। अजुनी उचलेन पाय ?। फजित करिन जरि न जाल ॥ १ ॥**

जा अगोदर त्या कमलच्या मागोमाग. तिची क्षमा मागा, तिचे पाय धरा, तिलाच चुकलों म्हणा आणि तिच्याजवळ प्रेमाची याचना करा! तुम्हीच तिला योग्य आहांत आणि तीच तुम्हांला योग्य आहे. जा अगोदर!

**सरस्वती**—मधुकर, खरंच कमल फार दुखावली. तिची समजूत घालणं, तिचे अश्रु थांबविणं तुमचंच कर्तव्य आहे. नाहीं का?

**मधुकर**—( उठून टोपी घालीत ) त्याशिवाय आतां गत्यंतरच नाहीं.

**मैना**—लवकर गेला नाहींत तर ती जिवाला एखादे वेळीं बरं वाईट देखील करून घ्यायची.

**सरस्वती**—जा, पण जातांना चहा घेऊन जा.

**मैना**—वहिनी, अशा वेळीं त्यांना चहा कसा घ्यायचा सुचेल?

**मधुकर**—अगोदर कमलची समजूत आणि मग चहा! कोणत्या कुयोगावर इथें आलों होतों कोण जाणें! ( जातो. )

**मैना**—( दोघी एकमेकीकडे पहातात व हंसतात.) कसं झालं वहिनी!

**सरस्वती**—अगदीं छान!

**मैना**—अगदीं शिकवलंस तस्सं?

**सरस्वती**—अहो, त्यापेक्षांही जास्त!

**मैना**—काकांच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन माझ्याशीं लग्न करूं पहात होतां ना? पांढरं फासून कावळा राजहंस व्हायला बघत होता!

**सरस्वती**—पण भली खोड मोडलीत तुम्हीं त्याची!

**मैना**—चांभाराच्या देवाची अशीच खेटरानं पूजा बांधावी लागते. (चहाकडे लक्ष जाऊन) वहिनी, चल बाई, आपण चहा तरी घेऊं या. त्यांच्या नव्हता नशीबीं म्हणून ते तसेच टाकून गेले. पण आपण निववून कां घालवा? ( दोघी चहा घेऊं लागतात. )

**सरस्वती**—पण दोन कप वांया जाणारच ते कोण घेणार?

**गजानन**—( हणमुकाकासह प्रवेश करून ) नाहीं होय म्हणतां म्हणतां उशीर झालाच कीं आपल्याला, हणमुकाका!

**हणमंतराव**—नाहींतर काय? तरी मी तुला केव्हांपासून ऊठ ऊठ म्हणत होतों. पण तें एक बरं झालं. पुन्हा त्याची तात मागें राहिली नाहीं.

**मैना**—( दोघांच्या पुढें चहाचे कप ठेवते.) वहिनी, ह्मणत होतीस नाहीं का, दोन कप वायां जातील ह्मणून? बघ झाला कीं नाहीं उपयोग!

**हणमंतराव**—अरे, आत्तां चहा!

**गजानन**—मधुकर येऊन गेला वाटतं?

**सरस्वती**—हो, आले, बसले, त्यांच्याचकरतां चहा झाला होता.

**हणमंतराव**—मधुकरपंत येऊन गेले का? रामकृष्ण हरी! बरं, कसं काय झालं? त्यांनीं मैनाला पाहिलं? मैने, तूं मधुकरांना पाहिलंस? सगळं ठाकठीकसं झालं ना? आम्हीं कुणी नव्हतों ह्मणून विचारतों?

**सरस्वती**—सगळं यथास्थित झालं! सांगून ठेवल्यावर आम्हीं कशा चुकूं!

**हणमंतराव**—बरं! बरं! तरी हरकत नाहीं. मग म्हणाले काय मधुकरपंत? जातांना त्यांनीं काय सांगितलं? मैना त्यांना पसंत पडली कां?

**सरस्वती**—( गजाननरावाकडे पहाते; दोघांच्या कांहीं सांकेतिक खुणा होतात.) जातांना मधुकर म्हणाले, बाहेरून आल्यावर दोघांनांही आमच्याकडे पाठवा. त्यांच्याजवळ समक्षच बोलेन. मैनाबन्स त्यांना पसंत पडल्याचं बरीक दिसलं!

**गजानन**—काय? आम्हां दोघांना बोलावलं आहे?

**सरस्वती**—तसंच कांहीं नाहीं. दोघांना येऊं द्या म्हणाले. एकटं कुणी आलं तरी चालेल.

**हणमंतराव**—मग मलाच गेलं पाहिजे. गजानना, मी आतांच जाऊन येतों. हो; म्हणजे पुन्हां आणखी हें नको! मुहूर्त जवळ आले आहेत, आपलं शुभंच शीघ्रंच झालं म्हणजे तितकं बरं म्हणतों मी. काय!

**गजानन**—असं म्हणतां? वास्तविक वेळेवर आपण हजर असतों म्हणजे हेलपाटा वाचला असतां. सगळ्या गोष्टी एकाच बैठकींत घडल्या असत्या. पण चुकलंच तें.

**हणमंतराव**—मी आतांच जाऊन निस्तरतों ती चूक. करता काय?

**गजानन**—पण त्याचं बिऱ्हाड तुम्हांला माहित नसेल. थांबा हं! अरे सदू, (सदू येतो.) तुला आपल्या मधुकराचं बिऱ्हाड माहित आहे ना?

**सदू**—जी व्हय.

**गजानन**—मग हणमुकाकांच्याबरोबर जा. त्यांना तें बिऱ्हाड दाखव. परत आल्यावर तुला दुसरं काम सांगायचं आहे. समजलास ?

**सदू**—जी व्हय ! दावून येतूंच नव्ह का.

**गजानन**—जाऊन येतांना मग आतांच ? हा सदू बरोबर आहे !

**हणमंतराव**—हा निघालोंच ना ? चल रे, हो पुढें ! ( दोघे जातात.)

**सरस्वती**—मधुकरांची आई आली आहे म्हणे.

**गजानन**—म्हणूनच तर हणमुकाकांना एकट्यांना धाडलं ! परस्पर प्रकाश पडूं दे. बरं इथें काय झालं ?

**सरस्वती**—इथें ? मैनावन्संनीं मधुकरांना चांगलीच सूर्याची पिल्लं दाखविलीं. आतां ते कांहीं पुन्हां मैनावन्संच नांव काढणार नाहींत.

**जी योजिली कृति-सार्थ केली । गुण दाविला । कुशला अशा ॥ ध्रु० ॥ बहु रंग झाला । ताई, गुणी या । छान होय मधु-संभावना ॥ १ ॥**

**गजानन**—आमची मैनाताई म्हणजे तूं काय समजलीस ? आतां हणमुकाका तिकडून परत आले म्हणजे ते मधुकराचं नांव घेणार नाहींत.

**सरस्वती**—म्हणजे मग आतां कमलशिवाय मधुकरांना गत्यंतर नाहीं.

**गजानन**—आणि मैनाताई शिवाय यशवंताला. पण त्याला अजून थोडा अडथळा आहे. तो अडथळा कमलची आई इथें आल्याशिवाय—

**सरस्वती**—मी कालच कमलच्या आईला ताबडतोब निघून येण्याबद्दल पत्र टाकलें आहे.

**गजानन**—असं ना ? ठीक ! मी मधुकराच्या आईला आणविण्याची कारवाई यशस्वी करून दाखविली; तूं कमलच्या आईला बेळगांवहून आणून यशस्वी होणार ! ठीक ठीक ! तेव्हां एकंदरींत काय या वेळेपुरतं तरी तुला मला असं जोरानं म्हणायला हरकत नाहीं कीं, ' रचिला ज्याचा पाया त्याची बरी उभारणि झाली ! ' आतां पुढें !

**सरस्वती**—पुढें काय ? आपल्याला आतां अपयश यायचं नाहीं !

**गजानन**—ठीक ठीक. (आनंदानें सिगारेट शिलगावीत आंत जातो.)

---

## प्रवेश तिसरा

( रस्ता—कमल आणि तिच्या मागोमाग मधुकर येतो. )

मधुकर—इतकं सांगितलं तरी तुझी समजूत पटंत नाहीं अजून कमल ?

कमल—आतां ती कधीं जन्मांत पटायची नाहीं.

मधुकर—कां बरं ? असा काय तुझा अपराध केला आहे मी ?

कमल—उलट मला विचारतां ? आपल्या मनालाच विचारा.

मधुकर—त्याबद्दलच मी आतां सांगितलं ना ? तें खोटं कां वाटतं ?

कमल—तें खोटं आहे म्हणून !

मधुकर—थट्टादेखील तुला कळत नाहीं ?

कमल—जीव घेणारी थट्टा न कळलेलीच बरी !

मधुकर—माझ्याविषयींचं तुझं मन कधींच साफ व्हायचं नाहीं का ?

कमल—काय कारण आहे ?

मधुकर—मग मी आतां करूं तरी काय ?

कमल—मला त्रास न देतां एकदम इथून जावं !

मधुकर—जाऊं ? कुठं जाऊं ?

कमल—मैनाताईकडे.

मधुकर—तिच्याकडे जायला सांगण्यापेक्षां प्राण द्यायला सांगेनास ?

कमल—तेंच सांगतें. कबूल केलेला प्राण मैनाताईच्या स्वाधीन करावा !

मधुकर—तिला मी पसंत केलं आहे असं तुला वाटलं तरी कसं ?

कमल—माझ्या कानांनीं प्रत्यक्ष ऐकलं म्हणून !

मधुकर—त्या सटवाईला उघडया डोळ्यांनीं मी पसंत कसा करीन पण ?

कमल—कां ? तिच्या वडिलांच्या अफाट संपत्तीकडे लक्ष ठेऊन ?

मधुकर—संपत्ति घेऊन मला काय करावयचं आहे ?

कमल—विलायतेला जायचं, बंगला घ्यायचा, मोटारी उडवायच्या आणखी सुचेल तें करायचं.

मधुकर—कमल ! कमा ! आग लाव त्या त्यांच्या संपत्तीला ! तुझ्या प्रेमाची सर या जगांत कशाला तरी येईल कां ? तुझं प्रेम—

**कमल**—प्रेम ? छीः ! कसला अर्थहीन शब्द !

**मधुकर**—काय ? प्रेम अर्थहीन शब्द ! कमल, तुला असं वाटतं ?

**कमल**—अन् असला अर्थ त्याला तरीपण व्यवहाराकरतां प्रेमाला दूर सारावं लागतं असं व्यवहाराचं शास्त्रच आहे ना !

**मधुकर**—कमा, तूं किती निर्दय, कठोर आहेस.

**कमल**—तुमच्याइतकी ? पुरुषाइतकी ?

**मधुकर**—इतके दिवस महासागराला मागें टाकील असं अलोट प्रेम मी तुझ्यावर केलं, त्याला तुझ्याजवळ काडीइतकीही किंमत उरली नाहीं !

**कमल**—हंडाभर दुधांत मिठाचा खडा टाकला कीं तें नासायचंच !

**मधुकर**—मग काय माझी चूक झाली म्हणूं का ?

**कमल**—केली म्हणा !

**मधुकर**—केली म्हटलं तर प्रायश्चित्त केल्यासारखं होईल का ?

**कमल**—चूक झाली तर प्रायश्चित्त ! जाणूनबुजून केलेल्या चुकीला प्रायश्चित्ताचा तरी काय उपयोग ?

**मधुकर**—बस्स ! कमल, तुझ्या शब्दाच्या चाबकाचे फटकारे मला आतां सहन होत नाहींत. हें पहा, या भर रस्त्यावर, चूक झाली म्हणून, तुझ्यापुढं हात जोडतों, पाया पडतों, कान धरतों, लोटांगण घालतों. शरणागताला क्षमा म्हण, केल्या चुकीची माफी कर ! घालूं का लोटांगण ?

**कमल**—अगोदर लाथ मारून मागाहून पाया पडण्याचा लोचटपणा पुरुषानांच म्हणून शोभतो.

**मधुकर**—आतां मात्र शिकस्त झाली ! तुझ्यापुढं करावं तरी काय ?

**कमल**—एकदां सांगितलं ना ? माझ्यापुढें कांहीं करूं नये ! मैनाताईपुढें जाऊन लांगूल चालन करावं !

**मधुकर**—अरेरे ! कुठली मला दुर्बुद्धी आठवली आणि—

**कमल**—माझ्यामागें येण्याची ना ? जा परत. अजून सुबुद्धी होऊं दे.

**मधुकर**—छेः छेः ! कमल, तूं इतकी निष्ठुर, दुष्ट, खट्याळ, दुसऱ्याचा छळ करण्यांत इतकी पटाईत असशील, याची मला कल्पना नव्हती.

**कमल**—आतां आली ना ? बरं झालं. लग्नाआधींच ही तुम्हांला

कल्पना आली म्हणून ! चुकून लग्न झालं असतं अन् मग कळलं असतं म्हणजे किती भयंकर झालं असतं ! झालं ? जातें आतां—

**मधुकर**—थांब ! कमल, मला टाकून जाणार ? कुठं जाणार ?

**कमल**—कां बरं ? मी कुठंही जाऊन जीव देईन !

**मधुकर**—काय जीव देणार ?

**कमल**—माझ्या जीवाची मी मुख्त्यार आहे. तुम्हीं कोण विचारणार ?

**मधुकर**—मी तुझा कुणी नव्हे अं ?

**कमल**—अंऽऽहं ! कुण्णी नव्हे !

**मधुकर**—मग आतां तूं कुणाची ?

**कमल**—मी कुणाची ? ( डोळ्यांत पाणी व तोंडावर हंसूं आणून ) मी आतां कुणाचीही असलें तरी तुम्हांला काय करायचं आहे त्यांच्याशीं ?

**न शंकिता विचारितां जरी मला । अधिकारा लव थारा नच उरत परि खरा। या अवनिवरि का कुणि न वरि। कधिं तरि मजला । मिळतिल सुखदिन ॥ ध्रु०॥ प्रिय-जन जगिं मम, कां मज पुसतां ? । हें सुम चुरतां, चुरडुनि त्यजितां। कशास वरवर। उगाच कळकळ ॥ १ ॥**

**मधुकर**—हं ! हं ! तूं आतां कुणाची हेंही मी समजलों आणि मला सोडून कुठें जाणार हेंही पण उमजलों !

**कमल**—होय ? कुठें जाणार मी ? कुणाची मी ?

**मधुकर**—माझ्याचकडून वदवावयाचं आहे ? ठीक आहे. ऐक तर. तुझ्याच बाबतींत जो माझ्याशीं स्पर्धा करीत आला आहे, त्या यशवंता-कडे तूं जाणार. त्याची तूं होणार.

**जो जगतीं अरि मला । त्याला वराया तव मन हें जाइ ॥ ध्रु० ॥ त्यजिसी मला । गणिशी खला । प्रेमदान करिसि त्यास । कुटिल मन उमजत । नको वचा । वदाया ॥ १ ॥**

( कमल चकित मुद्रेनें त्याच्याकडे पहाते. ) कां ? कळलं ? ओळखलं ?

**कमल**—कळलं, पटलं, ओळखलं ! अन् बरी आठवण पण करून दिलीत ! उपकारच झाले हे ! मी विसरलेंच होतें. तुम्हींच आठवण करून

दिलींत, त्यांच्याकडे आतां जातें. त्यांचीच होतें. यशवंतांची आठवण करून दिल्याचे उपकार मी कधीं विसरणार नाहीं.

**मधुकर**—खुशाल जा. माझ्या प्रतिस्पर्ध्यांचा संसार सुखाचा कर.

**कमल**—तुम्ही पण जा. सुखानें जा. मैनाताईशीं आनंदानें संसार थाटा ! सुखानें नांदा !

**मधुकर**—कमा, कमल, तुला दया, माया, प्रेम, प्रीति यापैकीं कांहीं ठाऊक आहे का ? त्यांची तुझी ओळख आहे का ? खरी खोटी प्रीती तूं माझ्यावर कधीं दाखविली होतीस काय ?

**कमल**—काय म्हटलंत ? मी तुमच्यावर प्रीती केली नव्हती !

**मधुकर**—केली होतीस. विवाहाचं वचन सुद्धां दिलं होतंस. पण तें इतक्यांत कसं विसरलीस ? स्त्रियांचं मन चंचल असतं म्हणतात, त्याचं प्रत्यंतर, इतक्या लवकर आणून द्यायला कशी तयार झालीस ?

**कमल**—कांहीं वाटतं कां जीवाला ? वचन कोण विसरलं ? तुम्हीं कां मी ? मन चंचल कुणाचं दिसलं ? तुमचं का माझं ? मीच वचन विसरून मैनाताईची परीक्षा करायला गेलें कां ? माझंच मन चंचल झालं म्हणून मला विसरून मैनाताईना पसंत करायला धांवला का ? चोराच्या उलटया म्हणतात त्या ह्याच !

**मधुकर**—गहजब झाला ! आजचा दिवसच खटयाळ उगवला. जिकडून तिकडून त्रास. जिकडून तिकडून अपमान ! घरीं ताप, बाहेर संताप ! कमा, मी तुझा शतशः अपराधी आहें. कृपा कर आणि एकदांच माझ्या सर्व अपराधांबद्दल क्षमा कर !

**कमल**—अशक्य आहे !

**मधुकर**—माझ्यावर जें एकदां खरंखुरं प्रेम केलं असशील, त्याचं स्मरण कर आणि त्याकरतां तरी—

**कमल**—त्या करतांच तुम्हीं हांक मारल्यावर, मनांत नसतांनाही थांबलें. इतका वेळ बोलणं ऐकलं. बोललें. पुष्कळ झालं. या उपर मला कुणाचं बोलणं ऐकण्याची गरज नाहीं आणि कुणाशीं बोलण्याचीही जरूरी नाहीं. तुम्हीं आपल्या वाटेनं जा. तिकडे रामाचं राज्य करा. मी आपल्या

वाटेनं जाणार, मनाला येईल तसं करणार! माझ्या वाटेला जाऊं नका. माझ्या भानगडींत पडूं नका ! मी कुणाची चौकशी करणार नाहीं. माझी चौकशी कुणी करूं नये. मला मनांतून कायमची काढून टाकली तर मी तें उपकारच समजेन ! ( मधुकर निराश होऊन जातो त्याच्याकडे पाहून )

**किति जीव हा तापला । असा हा । नच साहे मज वंचना मनाला ॥ ध्रु० ॥ घडली घटना जरी कशी ही । धरि दावा । पथ सुचे, रुचे नवा ना ॥ १ ॥** (जाते.)

---

## प्रवेश चौथा

(**मधुकराची राहण्याची** जागा–मधुकराची आई गंगासानी, पीरभाई, हसनबक्ष, सुलतानखां, इत्यादी गंगासानीचे बजवय्ये साथीदार.)

**पीरभाई**—( चिलमीचा झुरका मारीत गंगासानीस ) बाई,—

**गंगासानी**—काय चिच्या !

**पीरभाई**—आपण सांवतवाडी संस्थान सोडून या पेशवे सरकारांच्या पुण्याला आलों. तुह्मीं चला ह्मणाला, आह्मीं आलों—

**हसनबक्ष**—पण हें पुणं कांहीं आपल्या सांवतवाडी सारखं नाहीं ! पुण्यांत पेशवे सरकार दिसत नाहींत.

**सुलतानखा**—( बाजूचा तबला जवळ ओढून डग्गा घुमवीत ) अरे यार, पेशवे सरकारकी ऐसीतैसी ! पण बाईचा लडका–बेटा मधुकर–तो कुठें आहे ? काय बाई ? कुठं गेला आहे लडका ? कुच पत्ता है या नहीं ?

**पीरभाई**—हां ! मधुकरका तो पत्ताही लगता नही !

**गंगासानी**—कुठें गेलान् काय ? एकदां जो बाहेर गेला आहे तो अजून बाहेरच ! आम्हीं घरीं आलों याची त्याला शुद्ध तरी आहे कीं नाहीं कुणास ठाऊक ! चांगलं आम्हीं आलों, तर आमच्याजवळ बसायचं, आमची पूसतपास करायची, आम्हांला काय हवं नको बघायचं—

**हसनबक्ष**—( तंबोऱ्याची तार पिळीत ) तो लडका आपल्याशीं आल्याबरोबरच भांडला. आपण आलों तें त्याला आवडलं नाहींस दिसतं.

**सुलतानखा**—बेटा विचारतों तुम्हीं आलाच कां ! तुम्हांला बोला-वलं कुणी ? बेटा माच्या अंगावरच धांवला !

**पीरभाई**—जाऊं द्या बच्चा आहे !

**गंगासानी**—नाहीं तर काय ? पोरच तें. त्याला काय कळतंय ? आम्हीं त्याला न कळवतां आलों म्हणून रागावला. कळवलं असतं म्हणजे अगोदर त्यानं आपली बडदास्त राखली असती. म्हणून तो रागावला ! तो आपल्यावर रागावलां म्हणून आपण कां त्याच्यावर रागावायचं आहे ? (मधुकर प्रवेश करतो. रागानें टोपी काढून टाकतो आणि पाय आपटतो )

**पीरभाई**—मालक आले ! मालिक !

**हसनबक्ष**—हां जी मधुकरपंत !

**सुलतानखा**—सबूर ! मालिक गरम आहेत. बोलूं नका त्यांच्याशी !

**गंगासानी**—मधू, हें रे काय ? इतकीं माणसं तुला आपलेपणानं विचारीत आहेत, पण कुणाशीं एक शब्द बोलत नाहींस म्हणजे काय? सकाळीं आलों त्या वेळीं तसा रागावलास, बाहेर निघून गेलास. आतां आलास तो देखील रागांतच ! तुला इतकं रागावायला झालं आहे तरी काय !

**मधुकर**—कांहीं नाहीं !

**गंगासानी**—कांहीं नाहीं तर मग असे हातपाय का आपटतोस ? आम्हीं आलों म्हणून इतका राग कशाला ? आम्हांला पुणं पाह्यचं होतं. तूं अनायासं होतास. सहज लग्नीनसराई आलेली होती. म्हटलं जावं चार दिवस, आपल्या पद्धतीच्या गाण्याचं चीज झालं तर पहावं पुण्यांत. थोरा-मोठ्यांच्या लग्नांत झालीं चार गाणीं तर बरंच झालं. त्यांतून आपल्या त्या ह्यांनीं पण तसंच कळवलं म्हणून आलों. तर त्यांत बिघडलं काय ?

**मधुकर**—मा ! रागावूं नकोस ! गैरसमज करून घेऊं नकोस. मला न कळवितां आलांत म्हणून मला राग आला खरा. पण तो लगेच गेला. आतां मला बाहेर थोडासा त्रास झाला होता त्याचा परिणाम होतां इतकंच!

**गंगासानी**—आतां कसं बोलतोस ? आतां तुझ्या बोलण्यानेंच पोट भरून आलं !

**मधुकर**—मा, अजून तुम्हीं खाऊन घेतलं नाहीं ?

**गंगासानी**—वाः रे शहाण्या, तुला टाकून आम्हीं खाऊन घेणार का ? जेवण केव्हांच आणून ठेवलं आहे. आम्हीं तुझीच वाट पहात होतों.

**मधुकर**—अर्रर ! असं झालं कां ? पण मा, मला जेवायचं नाहीं. मी बाहेरूनच जेवण करून आलों. बाहेरच्या नादांत तुम्हीं आलांत हें ध्यानांतच राहिलं नाहीं. बरं, तुम्हीं आतां अगोदर सगळेजण खाऊन घ्या. मग सर्वजण सावकाश बोलत बसूं ! तुमची जेवणं होईपर्यंत मी बाकीचीं कामं उरकतों.

**गंगासानी**—मग सगळ्यांनीं तुझी उगीचच वाट पाहिली तर ? बरं, चिच्या, सगळीजणं खाऊन घ्या आतां. ( मधुकर लिहित बसतो. बाकी सर्व जातात. हणमंतराव 'मधुकरपंत, अहो मधुकरपंत' अशा बाहेरूनच हांका मारीत प्रवेश करतात. )

**मधुकर**—(गडबडीनें) कोण ? हणमुकाका आपण यावेळीं इकडे—

**हणमंतराव**—करतां काय ? तुम्हीं आमच्याकडे आलांत आम्हीं नव्हतों. आल्यावर कळलं. तुम्हीं येऊन गेलांत; मुलगी पाहिलीत. म्हणून आलों. हं बोला ? का ?

**मधुकर**—पण इतक्या घाईनें आलांत तेव्हां—

**हणमंतराव**—तुम्हांला घाईची आवश्यकता नव्हती पण आम्हांला घाई आहे ना ? मुलगी पाहिलीत ? पसंत पडली तुम्हांला ?

**मधुकर**—हो. तुमची मुलगी पसंत पडली आपल्याला.

**हणमंतराव**—ठीक. ठीक. आतां पुढें आम्हीं असं म्हणतों चार दोन दिवसावर मुहूर्त आले आहेत. पसंत म्हटल्यावर एकदां होईल तितकं लवकर व्यंकटरमणा गोविंदा उरकून घ्यावा ह्मणतों ! मी ह्मणतों तें खरं कीं नाहीं ? हं ! कार्याच्या कामांत ढिलाई करून भागत नाहीं.

**मधुकर**—पण हणमुकाका, पुन्हां मीच आपल्याकडे येईन. तुह्मीं, मी, गजाभाऊ मिळून पुढील सर्व ठराव केले तर नाहीं का चालणार ?

**हणमंतराव**—छे ! छे ! अहो, आतां तिथें काय आणि ईथें काय ? शिवाय गजानन कशाला पाहिजे? आपण करुं त्याला त्याची सम्मती आहेच समजा ! तुह्मांला माझी मुलगी पसंत पडली हें ठीक झालं. आतां पुढें बोलणं करायला हरकत नाहीं ! हो, मुख्य तीच अडचण होती.

**मधुकर**—आणि बाकीचं बोलणं पूर्वी बहुतेक झालंच आहे. तें मला मान्य आहे. आतां तुम्हीं कराल त्यांत मी आहे.

**हणमंतराव**—( सुपारी फोडीत इकडे तिकडे पहात ) मधुकरपंत—

**मधुकर**—काय ?

**हणमंतराव**—तुमचं ना बिऱ्हाड हें ?

**मधुकर**—हो. माझंच ! कां बरं ?

**हणमंतराव**—आणि हें—हें सामान, पेटी, तबला, तंबोरा, सतार, सारंगी—हें सामान कुणाचं ? तुमचंच का ? हा नाद आहे कां आपल्याला ?

**मधुकर**—आहे थोडासा !

**हणमंतराव**—असं का ? अरे वा: ! हें टीक आहे कीं ! म्हणजे कला आहेत या. या अवगत असल्या तर फारच उत्तम ! बरं गाण्यांतलं कांहीं अंग ?

**मधुकर**—तेंही आहे. पण थोडं ! आपले आम्हीं बाथरूम सिंगर—

**हणमंतराव**—तरी काय ? पुष्कळ झालें कीं ! बाकी, मधुकरपंत, धन्य आहे तुमची ! मुख्य अभ्यास संभाळून इतक्या प्रकारचा व्यासंग टेवणं म्हणजे सोपी गोष्ट नव्हे महाराज ! आपल्याला तुमचं कौतुक वाटलं ! मनुष्य असं हरहुन्नरी पाहिजे. मधुकरपंत, तुमच्याबद्दल जों जों विचार करावा तों तों आमच्या मैनेनं नशीब काढलं असं वाटू लागतं. याला म्हणतात सुयोग. मैनेचं सौभाग्य मोठं म्हणून तुमच्यासारखा पति तिला मिळणार ! वा: ! काय गोष्ट बोलावी ? तुमच्यासारखा जांवई लाभल्या-बद्दल मला अगदीं कृतकृत्य वाटतं ! आतां उभयतांच्या विचारानें एकदां शक्य तितका जवळचा मुहुर्त ठरवून टाकूं या.

**मधुकर**—हणमुकाका, मुहुर्ताकरतां आपण गजाभाऊंच्याकडे आत्तांच जाऊं या. त्यांच्या आपल्या विचारानें मुहुर्त ठरलेला बरा ! मुहुर्त ठरवायला गजाभाऊ पाहिजेतच ! मग चलूं या का आत्तांच तिकडे ?

**हणमंतराव**—असं म्हणतां ? माझी कांहीं ना नाहीं. पण मुहुर्त लव-कर ठरवायचा तो आमच्या सोईकरतां—दूरचा पाह्यचा तो तुमच्याकडून येणाऱ्या मंडळीकरतां. तें तुम्हीं ठरवायचं आहे. तें ठरवायला गजाननाची कांहीं जरूरी नाहीं. सांवतवाडीहून तुमची मंडळी येणारच ना कांहीं ?

**मधुकर**—हो तर! पण ऐन वेळेवर काय होत पहावं. (पीरभाई येतो. )

**पीरभाई**—मधुकरपंत, मालिक—

**मधुकर**—काय ! झालीं जेवणं तुमचीं ?

**पीरभाई**—ठाव घातले आहेत. सगळ्यांची इच्छा आहे कीं तुम्हीं बरोबर बसलंच पाहिजे.

**मधुकर**—पण माझं जेवण झालं आहे ना ! बसा तुम्हीं, जा.

**पीरभाई**—छे छे ! मालकांना टाकून कसं बसावं ?

**हणमंतराव**—तुमचं अजून जेवण व्हायचं आहे ! आणि हे कोण ?

**मधुकर**—हे ! हे आमचे उस्ताद ! यांच्याचकडून या कलेचं शिक्षण घेतों ना मी !

**पीरभाई**—मग काय मालिक ? चलतां ना ? माला सांगू ना येता आहांत म्हणून ? ( जातो. )

**हणमंतराव**—मा ? मा म्हणजे मातुःश्री! मधुकरपंत, तुमच्या मातुःश्री आल्या आहेत कीं काय ? केव्हां ? वाः, छान झालं ? आम्हांला दादसुद्धां लागू दिली नाहीं. आपल्या ऐन कार्याच्या वेळीं दाखल झाल्या म्हणायच्या,याला म्हणतात सुयोग ? मधुकरपंत, केव्हां आल्या तुमच्या मातुःश्री ?

**मधुकर**—माझी आई ? छे ! माझी आई कशी येणार ? ती त्या आमच्या उस्तादांची मा आहे. ती आज माझ्याकडे जेवायला आली आहे!

**हसनबक्ष**—(प्रवेश करून) मधुकरपंत! मा विचारते कीं तुह्मीं येता कां मीच हांक मारावयाला येऊं? पीरभाई ह्मणाले, तुमच्याकडे कुणी आलं आहे ते जेवण होईपर्यंत बसतील. नाहींतर त्यांनाच घेऊन या जेवायला. तुह्मीं येत आहांत ह्मणून सांगतों. ( जातो. )

**मधुकर**—काय हट्टी लोक आहेत हे ?

**हणमंतराव**—मधुकरपंत, हे कोण ?

**मधुकर**—हे मघाच्यांचेच भाऊबंद !

**हणमंतराव**—मधुकरपंत, तुमच्याकरतां सगळी मंडळी जर खोळंबली आहेत, तर जा ना जेवायला. तुमचे गुरुजन आहेत. त्यांची मर्जी कशाला मोडतां. तुमचं जेवण होईपर्यंत मी बसतों.

**मधुकर**—छेः कशाला ! आपल्याला मुहुर्त ठरविण्याकरतां अगोदर गजाभाऊंच्या घरीं जायचं आहे ना ? तिकडून जाऊन आल्यावर सावकाश जेवण होईल. ( सुलतानखां बोलवायला येतो त्यास ) उस्ताद, तुम्हीं जेवणं करून घ्या. मी यांच्याबरोबर जरा बाहेर जरूरीच्या कामाकरतां जाऊन येतों आहे. माझी वाट पाहूं नका. संकोच न करतां सगळेजण जेवण करून घ्या. हणमुकाका, चलता ना ?

**गंगासानी**—( प्रवेश करून) हें रे काय मधू, बाहेर कुठें निघालास? पान मांडलेलं डावलून का जात असतात ? अगोदर आमच्याबरोबर जेव आणि मग कुठें जायचं तें जा. (हणमुकाकांकडे पाहून) यांच्याबरोबरच कां जायचं आहे ? मग जेवण केल्यावर तुमच्याबरोबर आला तर चालेल ना ? मग झालं तर! आपणच सांगा, हा जेवण टाकून असाच निघाला तर आम्हांला जेवण जाईल कां ?

**मधुकर**—काय हरकत आहे ? खुशाल जेवा ! हणमुकाका, चला हो—

**गंगासानी**—तूं जेवत नाहींस तर मी पण जेवत नाहीं. पाहूं दे तुला आपल्या आईची कळकळ तरी किती आहे ती—

**हणमंतराव**—अं ! काय ? मधुकरपंत, या—

**मधुकर**—मघाशीं सांगितल्या त्याच ह्या पाहुण्या !

**गंगासानी**—पाहुणी ? मी पाहुणी ? मधू, काय बोलतोस रे ? मी आजच सांवतवाडीहून मुद्दाम आले आपल्या मुलाकडे !

**हणमंतराव**—काय ? आपण मधुकरपंतांच्या मातुःश्री ?

**गंगासानी**—हो ! मधू माझाच मुलगा ! त्यानें नाहींच का सांगितलं आपल्याला ? मधू, मी आल्याचं तूं सांगितलंच नाहींस कां ?

**हणमंतराव**—तुह्मीं मधुकरांच्या मातुःश्री ह्मणजे —?

**मधुकर**—(गडबडीनें) हणमुकाका, तें या लोकांना नीट नाहीं सांगतां येणार! बाहेर चला. ही सर्व भानगड तुह्मालां नीट समजावून सांगतों.

**हणमंतराव**—बरं, पण आपण अमेरिकेहून कधीं आला ?

**गंगासानी**—कोण ? मी ? मी कशाला अमेरिकेला गेलें होतें ? मी सांवतवाडीहून आलें ती दिखील मोठ्या मिनतवारीनं. तिथल्या सरकारांचा

मला तनखा आहे. वाड्यांत दररोज हजेरी द्यावी लागते ह्मणून संस्थान सोडून आह्मांला फार कुठें जाता येत नाहीं. मग आह्मीं अमेरिकेला कुठून जाणार ! हें मधूनं सांगितलं वाटतं ! कांहीं तरी आपलं कुणाला तरी सांगत असतो. मधु, यांत कसलारे मोठेपणा मिळवलास ?

**हणमंतराव**—आपण आलांत—ठीकं झालं. मधुकरांचे वडील—?

**गंगासानी**—देवधरसाहेब कां ! अरे देवा ! ते आज हयात असते तर आणखी काय पाहिजे होतं ? पण आम्हीं कमनशिबाची पडलों त्याला काय करायचं ? हेंच आतां आमच्या मधुला पाहिलं असतं म्हणजे त्यांना केवढा आनंद झाला असता ! लाखांत माणूस होता बरं, त्यांच्या कृपा छत्राखालीं होतों तिथपर्यंत आम्हांला कसलीसुद्धां काळजी नव्हती. ( मधुकर हणमंतरावांच्या मागें राहून, गप्प रहा बोलूं नको अशा अर्थाच्या खुणा करतो.) हें र काय, मधु, असे वेड्यासारखे हात काय नाचवतोस ? तोंड काय वेडी वांकडी करतो आहेस ? माणूस नीट विचारतय, आपलेपणानं बोलतय तर त्याला सांगायला नको ? ( हणमुकाका मागें वळून पहातात. मधुकर पाठ फिरवून येरझारा घालूं लागतो ).

**हणमंतराव**—एकूण असं आहे म्हणतां ? म्हणजे तुम्ही सांवतवाडी संस्थानांतल्या रहाणाऱ्या ? त्या सरकारकडून तुम्हाला गाण्याबद्दल तनखा आहे ? म्हणजे तुमचं घराणं गाणाऱ्याचं तर ?

**गंगासानी**—अगदीं अस्सल घराणं ! डेरेदार !

**हणमंतराव**—तेंच मी म्हणतों. तुमचा मुलगा मधुकरपंत. देवधरसाहेब म्हणजे आपले यजमान. आतां हयात नाहींत. तुम्ही सहपरिवार मधुकरपंतांना भेटायला आला आहांत—

**गंगासानी**—हो त्यालाही भेटायला आणि तुमच्या पेशव्यांच्या या पुण्यांत लग्नसराई आहे तेव्हां थोरामोठयांकडे आमच्याकडल्या गाण्याच्या पद्धतीची गाणीं झालीं, चीज झालं तर पहावयाला ! पण मी सांगतें, यांत आमच्या मधुचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. त्याला आतां वकिलीचा बडेजाव आला आहे ना? मी म्हणतें अरे, कर काय पाहिजे तें कर. मला त्यांत आनंदच आहे. पण आपल्या घराण्याची पहिली रीत का सोडा-

वयाची ? पण त्याचं ते कांहीं नाहीं. अहो, जेवायला आयता चल म्हटलं तर जो येत नाहीं तो पुढें होऊन गाण्याकरतां काय खटपट करणार आहे ?

**हणमंतराव**—अरे हो ! अजून तुम्हांला जेवायचं आहे नाहीं का ?

**गंगासानी**—बसा तोंपर्यंत आपण ! जेवण झाल्यावर आपण बोलूं. तुमचा उपयोग आम्हांला झाला तर हवाच आहे. मधु,चल, चिच्या चला. ( हणमंतरावास ) बसतां ना आपण तोंपर्यंत ?

**हणमंतराव**—नाहीं. नाइलाज आहे ! मला जरा जरूरीचं काम आहे. मला बसायला वेळ नाहीं. तुम्हीं खुशाल जेऊन घ्या. मी येतों आतां.

**गंगासानी**—मग काय ? पुन्हां याल ?

**हणमंतराव**—तें पाहीन सवडीप्रमाणें. ( घाईघाईनें जातात. )

**मधुकर**—झालं ? केलंस माझं वाटोळं ? अगदीं या कानापासून त्या कानापर्यंत कापलास माझा गळा ? आई कसली तूं ? माझा घात करणारी चांडाळीण ! असा माझा घात करण्याकरतांच सावंतवाडीहून इतक्या लांब बोलावल्यासारखी आलीस वाटतं ?

**गंगासानी**—पण असं वेडंविद्रं बोलायला झालं काय? मी काय केलं?

**मधुकर**—आणखी काय करायचं बाकी ठेवलं आहेस ? आत्तांच आपल्याबरोबर मला जेवायला घालायचा तुला एवढा पुळका कां आला ? आत्तां जेवलों नसतों तर काय मेलों असतों मी ? आणि 'हा माझा मुलगा, मी याची आई ' असं वांकडे तोंड करून जीभ लांब करून सांगितलं नसतंस तर काय आपलं मायलेकाचं नातं रसातळाला जात होतं ?

**गंगासानी**—बाई ! बाई ! बाई ! बाई ! अगदीं आभाळच कोसळल्यागत बोललास कीं ! इतकी डोक्यांत राख घालायला झालं काय असं ? ते कोण होते ? त्यानां कांहीं सांगायचं नव्हतं कां ? अन सांगितलं म्हणून चूक काय झाली ? बापडा सरळ दिसला, भलेपणानं त्यानं विचारलं म्हणून मी तरी सांगायला गेलें–

**मधुकर**—पण सांगूनच त्याला सरळ होता तो वांकडा केलास ! भला होता त्याचा बुरा बनवलास ! आपली उपवर मुलगी आणि गांठचा पैसा माझ्या स्वाधीन करायला आपण होऊन माझ्या घरीं चालत आला होता.

एका चांगल्या ब्राह्मणाची पोर मला मिळत होती! मला तो चित्पावन समजत होता. मी त्याचा तो समज कायम राखला होता. आतां मी तुझा मुलगा म्हणून कळल्यावर तो येईल तरी पुन्हा का? देईल का आपली मुलगी मला? गेली, बायकोही गेली आणि तिच्याबरोबर येणारी संपत्ती पण गेली.

**गंगासानी**—अगबाई! असं कां होतं तें? मला रे काय माहित हें? आधीं तर सांगायंच नव्हतंस? माहित असतं तर मी रे कशाला बोललें असतें. एका शब्दानं तरी तूं मला कल्पना दिली होतीस कां?

**मधुकर**—मग मघाशीं एकसारखा खुणा कसल्या करीत होतों तर? पण तूं कशाला त्याकडे लक्ष देशील? तुला पुत्रप्रेम पाघळायचं होत ना?

**गंगासानी**—चुकलें बाबा मी! अगदीं सपशेल चुकलें. मग ही एक बायको गेलीच म्हणायची? आतां—

**मधुकर**—आतां दुसरी! पण तूं येऊं देशील तेव्हां ना? एकीला घालविलीस तशीच दुसरी.

**गंगासानी**—नाहीं रे बाबा! आतां अगदीं कानाला खडा!

**पीरभाई**—(प्रवेश करून) बाई, एकदां दोन घांस पोटांत घालायचे ना?

**गंगासानी**—होय कीं! मधु, चल मुकाट्यानं आतां तरी! मघाशीं अन्नाला बाजूला सारलंस म्हणून तुझी पहिली बायको पळाली. जेऊन घे अन् उद्योगाला लाग. दूर गेलेली बायको आपल्या पायीं चालत येईल बघ.

**मधुकर**—आईच पडलीस! ऐकलंच पाहिजे. तुमच्या मनासारखं होऊं द्या. जवळ आलेली मैना उडाली; दूर झालेली कमल—फिरून त्याकरतां प्रयत्न! चला मासाहेब. (जातात.)

## दुसरा अंक समाप्त

# अंक ३ रा



## प्रवेश १ ला

( रस्ता-हणमंतराव व गजाननराव येतात )

**गजानन**—आलांत हणमुकाका ?

**हणमंतराव**—अगदीं सही सलामत, जीवानिशीं व अब्रुनिशीं आलों !

**गजानन**—म्हणजे ! म्हणतां काय हणमुकाका ! आणि असे रागावल्यासारखे, घाबरल्यासारखे काय करतां ?

**हणमंतराव**—काय सांगूं तुला, हांसूं का रडूं तेंच मला कळत नाहीं.

**गजानन**—म्हणजे ? झालं काय असं ! तुम्हीं मधुकराकडे गेला होता ना ! काय झालं ? मधुकर काय म्हणाला ?

**हणमंतराव**—मधु मेला !

**गजानन**—आं ? काय म्हणतां ? केव्हां ? कशानं ? अरेरे ! आपल्याकडून तर नुकतांच सकाळीं गेला ना ? इतक्यांत काय झालं त्याला ? हार्ट फेल झालं, का एखाद्या ॲक्सिडन्टमध्यें सांपडला ? काय झालं तरी काय ?

**हणमंतराव**—व्हायचंय काय ? अन् त्या लेकाला मरायला काय धाड भरली आहे ? चांगला जीवंत आहे तो.

**गजानन**—वाः ! छान् ! मग तुमचं त्याचं कांहीं बिनसलं वाटतं ? तो तुम्हाला कांहीं अपमानकारक बोलला कीं काय ?

**हणमंतराव**—मला अपमानकारक बोलायची त्याची काय माय व्याली आहे ? तिथल्या तिथं थोबाड रंगवून मोकळा झालों असतों.

**गजानन**—मग कुंठ माशी शिंकली ? मैनाताईला मधुनं पसंत तरी केलं ना ? काय म्हणाला काय ?

**हणमंतराव**—म्हणतो काय ? नी लोण्याचा गोळा पसंत करायला



**हणमंतराव**--अरे लेकाऱ्यो! अरे, तुम्हीं नवराबायको कां बहिणभाऊ ?—

बोक्याचं काय बिघडणार? पण बोक्याला लोण्याचा गोळा पचूं द्यायचा नसतो. त्याच्या पाठींत चांगला बडगा घालावा लागतो.

**गजानन**—हणमुकाका, नीट काय तें सांगा! तुमचं कोड्याचं बोलणंच मला कळेना!

**हणमंतराव**—त्यांत काय कळायचं? कारटीचं बाशिंगबळच खडतर दिसतं! तरी मी औंधकर ज्योतिषांना स्पष्ट विचारलं होतं. पोरीची पत्रिका लक्षपूर्वक पहा आणि स्पष्ट काय तें सांगा म्हणून. त्यांनीं त्याप्रमाणें सांगितलंही होतं. मग असं का झालं?

**गजानन**—एकूण मधुचं स्थळ फिसकटलंच म्हणतां? पण तुम्हींच तर तें प्रथम आग्रहानं पसंत केलंत.

**हणमंतराव**—बाबा! माझी म्हातारपणीं बुद्धि चळली, दृष्टि गेली, कान लांब झाले, अक्कल शिकवायला मला कुणी नव्हतं म्हणून चकलों. म्हणूनच हिरा म्हणून शिरगोळा जवळ करित होतों. राजपुत्र समजून रांडलेकाच्या गळयांत पोरीला बांधायला तयार झालों होतों.

**गजानन**—म्हणजे? म्हणतां काय तुम्हीं, हणमुकाका?

**हणमंतराव**—मी गाढव बनलों म्हणून सांगतों ना? शहरांतले सारे साळसूद समजलों. झकपक पोषाखाला भाळलों. त्यांच्या पुस्तकी पोपटपंचीला भुललों, चढलों आणि मागचा पुढचा विचार न करतां बटकीच्या बेट्याच्या पदरांत पोरगी टाकण्याइतका पागल बनलों!

**गजानन**—काय? मधुकराबद्दलच बोलतां कां हें?

**हणमंतराव**—तर काय तुला खोटं सांगतों? ह्या ह्या डोळ्यांनीं त्याची आई–ती बटीक बघितली! ह्या ह्या कानांनीं तिच्याच तोंडून तिची कुळकथा ऐकली. अगदीं त्या मध्याच्या देखत ऐकली! बोल आतां!

**गजानन**—असं कां! अरेच्या! आम्हांला कांहीं कल्पनाच नाहीं.

**हणमंतराव**—लफंगे, लुच्चे, हलकट, लेकाचे! या लेकांना मारे चाबकाखालीं झोडपून काढले पाहिजे. कोर्टांत खेचलं पाहिजे.

**गजानन**—बाकी बरं झालं, अगोदर कळलं म्हणून! नाहीं तर नंतर केवढी पंचाईत आली असती. हें एकपरी ठीक झालं!

**हणमंतराव**—हें ठीक झालं खरं. पण पुढें काय ? पोरीला उजवायची 'कशी ? केव्हां ? दिवस तर अगदीं थोडे उरले. ह्या लेकानं असा दगा दिला–

**गजानन**—दिला नाहीं; दिला असता खरा ! पण मैनाताईंचं भाग्य खरंच चांगलं दिसतं; म्हणूनच तिच्यावरचं हें संकट असं अकल्पित टळलं. आतां मी सांगतों; हणमुकाका, आपल्या औंधकर आणि नारायणशास्त्री अष्टेकर या दोन्हीं ज्योतिष्यांचीं भविष्यें खरीं ठरणार आणि मैनाताई सुस्थळींच पडणार ! मधु असा गेला—

**हणमंतराव**—आणि तो तुझा यशवंत तसा निसटला. शहरांतले लोक सारेच असे लफंगे कसे म्हणतों मी—

**गजानन**—माझी कल्पना आहे, यशवंत अजून हातचा निसटला नाहीं. त्याच्या प्रेमाच्या वेडाला तितकासा कांहीं जोर नाहीं. आणि तें त्याचं वेड विकोपालाही गेलेलं दिसत नाहीं. तुमचा तितका विरोध नसेल तर मी पुन्हां त्या स्थळाबाबत कसून प्रयत्न करून पाहीन. आणि त्यांत मला यश येईल अशी माझी कल्पना आहे !

**हणमंतराव**—मग पहा. तो पहा. आतां माझी मतीच गुंग झाली आहे. तूंच काय करायचं तें कर ! त्याला आण. मला तो पसंत नव्हता असं नाहीं; पण त्यानंच तंगडी झाडली म्हणून तो माझ्या मनांतून उतरला होता. बाकी मला तो तसा पसंत आहे, पण तो तरी मिळाला पाहिजे ना ?

**गजानन**—तें पहातों आतां मी. आपण स्वस्थ असा. मनाला त्रास करून घेऊं नका. मधुबद्दल विचारही मनांत येऊं देऊं नका.

**हणमंतराव**—मनांत येऊं देऊं नको ! वेडा आहेस ! त्याच्याबद्दल विचार केलाच पाहिजे. चांगला विचार करतों. या लेकांना तसं सोडून सोय नाहीं. आम्हीं सुटलों तर हे पाजी लोक आमच्यासारख्याच दुसऱ्या लोकांना जाळ्यांत अडकविल्याखेरीज राहाणार नाहींत. यांचा पाजीपणा वर्तमानपत्रांतून चवाठ्यावर आणला पाहिजे. यांचं खरं स्वरूप लोकांच्या निदर्शनाला आणून त्यांच्यापासून सावध राहण्याकरतां सावध केलं पाहिजे.

**गजानन**—जाऊं द्या. तूर्त आपल्याला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. जो करील तो भोगील. आधीं आपण आपलं मुख्य कार्य पाहूं.

**हणमंतराव**—कर्तव्य नाहीं ! अरे, या बाबतींत इतका लख्ख प्रकाश पडल्यानंतर काय करायला पाहिजे हें तुझ्यापेक्षां मलाच जास्त समजतं ! आतां मला शहाणपणा शिकविण्याच्या भागनडींत पडूं नकोस ! तूं आपला, तुझा तो यशवंत किंवा तसा दुसरा कुणी तुझ्या आडाख्यांत असला तर तो पहाण्याच्या नादाला लाग. बरं, तूं—

**गजानन**—मी जरा माझं तें बँकेसंबंधाचं कांहीं महत्वाचं काम आहे तिकडे जाऊन येतों. जातां जातां यशवंताची चौकशी करतोंच.

**हणमंतराव**—ठीक आहे. कर चौकशी. विचार त्याला. पुन्हां एकदां पाहिजे तर त्याला घरीं घेऊन ये. मी आतां घरींच जाऊन त्या हरामखोर मध्याच्याविरुद्ध वर्तमानपत्रांत द्यायचा एक झणझणीत लेख तयार करतों. पण तूं, तास दीड तासांत—

**गजानन**—हो बहुतेक ! एखादा तास जास्त इतकंच ! पण हणमुकाका, मला दाखविल्याशिवाय तुमचा लेख कुठें देऊं नका मात्र !

**हणमंतराव**—अरे, मी कशाला लेख लिहितों आहे ! तुझ्याकडूनच लिहून घेईन आणि माझ्या नांवावर छापीन म्हणतों ! (जातात.)

---

## प्रवेश दुसरा

(**कमलचें बिऱ्हाड**—कमल व तिची आई तुळसाबाई.)

**कमल**—आई, तूं कुठें निघालीस ?

**तुळसा**—माझ्याबरोबर काल त्या शरणा, शहाणी, प्रेमा आल्या आहेत ना, त्या आज मुंबईला जाणार आहेत. त्यांना यायचं कबूल केलं आहे. त्यांनीं पत्तासुद्धां मुद्दाम देऊन ठेवला आहे. म्हणून तिकडून जाऊन येतें. जाऊं ना ?

**कमल**—जा; पण लवकर ये बाई !

**तुळसा**—कां ! तुला कुठें बाहेर का जायचं आहे ?

**कमल**—नाहीं. पण तूं बाहेर गेलीस म्हणजे करमणार नाहीं, तूं जवळ आहेस म्हणून, नाहीं तर—

**तुळसा**—नाहीं तर काय, परवांसारखी रडत बसणार वाटतं ! पुरे झालं बाई तुझं रडणं ! तुला आतां हें कां सांगायला हवं ? अशानं तुला आजारी कां पडायचं आहे ?

**कमल**—आतां आजारी पडलें काय अन् मेलें काय बिघडेल काय त्यांत!

**तुळसा**—चल, बोलूं नकोस असं वेडंविद्रं. तुझा जीव असा वर का आला आहे ? अन् लोकांना आला असला, तरी मला नाहीं अं ! तें कांहीं नाहीं, तुला आपली जातांना बरोबर बेळगांवलाच नेतें कशी ! तुझ्या मनांत वेडे विचार यायला नकोत. चल, मला जायला उशीर होतो.

**कमल**—पण आणि एकदां चांगलासा चहा करून घेऊं या. मग जा.

**तुळसा**—म्हणजे आणखी तितकाच माझा वेळ इथं जाईल ! बरं. कर तर. तूं तरी कमल अशी आहेस—

**गजानन**—( यशवंतसह प्रवेश करून ) सांगतों ना यशवंत तुला, कमल अशी कांहीं चमत्कारिक मुलगी आहे. काय, कमा, आहेस कां घरीं?

**कमल**—अगबाई ! कोण ?

**गजानन**—मी तो गजानन आणि हा आपला यशवंत ! दोघेही आलों आहोंत तुझ्या समाचाराला ! म्हटलं झालं काय तुला आज तीन दिवस ? घरीं आली नाहींस. तुझा पत्ता नाहीं. तुझी मैत्रीण एकसारखी चौकशी करते आहे, वाट पहाते आहे, आठवण काढते आहे. अखेर मला तिनें सक्तीची आज्ञाच फर्मावली कीं एकदां कमाताईकडे जाऊन तरी या.

**कमल**—मला वाटतंच होतं. पण काय करणार ? परवां बेळगांवहून माझी आई आली, तिच्यामुळं मला कुठें हलतांच आलं नाहीं ! हो, ही माझी आई ! अन् आई, ( तिच्या कानाजवळ जाऊन हलकेंच गजाननरावांकडे पहात) मी म्हणत होतें ना माझी सरूताई मैत्रिण आहे, तिचे हे—

**तुळसा**—असं का ! (गजाननरावांस) बसा कीं आपण ! उभे का असे ? सरूताईबद्दल आणि आपल्याबद्दल आमची कमा दर पत्रांत मला लिहित असे. इथें आल्यापासून तर साऱ्या आपल्याच गोष्टी चालल्या आहेत. माझ्यामुळेंच तिला आपल्याकडे येतां आलं नाहीं; अन् दोन दिवस तिच्या जीवालाही बरं नव्हतं !

**कमल**—कांहीं नाहीं हो ! आई आपलं कांहीं तरीच सांगते !

**तुळसा**—कमा, अशी बोलतच काय राहिलीस? ज्यांच्याबद्दल तूं इतकं सांगितलंस, सांगतेस, ते घरीं आले तर त्यांना बसा सुद्धां म्हटलं नाहींस.

**कमल**—पण तूं म्हणालीस ना ? शिवाय घरच्याच माणसाला बसा म्हणायला कशाला हवं ?

**गजानन**—खरं आहे कमल तुझं म्हणणं !

**तुळसा**—पण घरचीच झाली म्हणून त्यांना जेवायला हवंच असतं. निदान त्यांना चहापाणी तरी देशील कीं नाहीं ?

**कमल**—ही बघ आत्तां इतक्यांत करून घेऊन येतें ! ( यशवंताकडे हळूंच चोरून पहात किंचित् प्रफुल्लितपणानें हंसत हंसत आंत जाते.)

**गजानन**—आपण परवा वेळगावांहून आलांत का ?

**तुळसा**—हो,परवा मेलनं आलें. कमाचं पत्र आलं होतं म्हणून आलें.

**गजानन**—आणि तुम्ही येण्यापूर्वीच कमल आजारी झाली होती का ? काय होत होतं तिला ?

**तुळसा**—व्हायचं काय दुसरं ? तरूण पोरी या. यांना व्हायला काय लागतं आणखी ? हिच्यावर कुणाचसं प्रेम होतं म्हणे ! हिच्याशीं लग्न करायचं त्यानं जवळजवळ वचनसुद्धां दिलं होतं. कमाच वरचेवर पत्रांत लिहित होती हें ! कोण तो पहा मेला—काय त्याचं नांव हो—हं, मधुकर. अन् त्यानं म्हणे, आयत्या वेळेला हिला फसवलंन् ! हिला न कळवतांच दुसरी मुलगी त्यानं पाहिली. त्यांचं लग्नही ठरलं. तें हिला कळलं. झालं. त्या वेळेपासून आली घरांत आणि बसली रडत ? मी आल्यापासून तिच्या डोळ्याला खळ नाहीं. मग कसं बरं वाटणार. आपणच सांगा.

**गजानन**—असं का? एकूण मधुकरानं कमाला चांगलंच चकवलं अं?

**तुळसा**—हं ! पण करायचं काय ? बोलायचं कुणी ? म्हणच आहे, थोरांनीं खाल्लं म्हणजे औषधासाठीं नी लहानांनीं खाल्लं म्हणजे पोटासाठीं! हेंच फसवण्याचा आळ कमावर आला असतां म्हणजे काय झालं असतं ?

**गजानन**—पण कमल फसवणार काय ? ती मुलगी मुळींच तशांतली नाहीं. साधी, सरळ, प्रेमळ ! ती आपण होऊन कांहीं चुकायची नाहीं.

**तुळसा**—तें तर आहेच. पण त्याशिवाय माझं वरचेवर सांगणं असे ना, कीं बाई, आपण बोलून चालून अशा पडलों. कुणी समजूनउमजून तुला पत्करून तुझ्याशीं लग्न लावायला तयार झाला तर सोन्यापेक्षां पिवळं होईल. तसं होऊं दे. पण कांहीं लपवूंछपवूं नकोस. आज तें बरं वाटेल पण पुढें जन्मभर तें तुझ्याच त्रासाला कारण होईल ! तिच्या वडिलांची—आमच्या हर्डीकरांची—सुद्धां कमाला हीच सांगणी. तिच्या इच्छेप्रमाणें त्यांचीही इच्छा कमाचं लगीन व्हावं अशीच आहे. आमच्यासारखं असूंच नये. आमचं एक झालं कसं तरी. ( कांहीं आठवण होऊन ) थांबा हं जरा. कमा नुसताच चहा घेऊन यायची. वेंधळी आहे ती. चहाबरोबर कांहीं फराळाचं आणायचं सुचायचं नाहीं तिला. जरा आंत जाऊन तिला सुचवून येतें हं. ( चट्दिशीं उठून आंत जाते. )

**यशवंत**—(गजाननराव व यशवंत परस्पराकडे पहातात.) गजाभाऊ !

**गजानन**—आलं लक्षांत यशवंत ? मधु-कमाचं फिसकटलं. कमलला फार त्रास झाला. त्यानं तिला फसवल्याचं तिला दुःख झालं. त्यामुळेंच तिनं तुला कळवलं नाहीं. बरं झालं, आज अनायासें आलास. आज तुझी मागणी तिच्यापुढें मांडायला हरकत नाहीं. मोका तर छान आला आहे !

**यशवंत**—होय. पण कमल कलंकितेची कन्या ! रखेलीची मुलगी !

**गजानन**—हो. मग ? तें तर तिच्या आईच्या तोंडून आत्तांच तुलान् मलाही कळलं. पण मग झालं काय, तसं असलं म्हणून ?

**यशवंत**—कमल मला भेटून हेंच सांगणार होती !

**गजानन**—असेल. पण तें तिनं सांगायच्या अगोदरच कळलं ! तरी काय बिघडलं ? तिच्यावर तुझं प्रेम आहे. शिवाय तिच्या वैगुण्यासुद्धां स्वीकार करीन असं तूं तिला एकदां वचनही दिलं आहेस. मग काय तर ? आतां तुझी मागणी फेटाळली जाणार नाहीं.

**यशवंत**—तें खरं ! पण माझं कमलवर प्रेम असलं तरी, घरांतल्या मंडळींच्या संबंधानं—

**गजानन**—त्यांच्यासंबंधानं काय ? आई आड येईल ? वडील विरुद्ध जातील ? बंधू बाहेर घालवितील ? बहीण बोलणार नाहीं ?

**यशवंत**—अर्थात् !

**गजानन**—पण प्रेमाच्या प्राप्तीकरतां तूं या बंधनाच्या पलीकडे जायला तयार आहस ना ?

**यशवंत**—छेः ! गजाभाऊ, कमलवर आपलं प्रेम असलं तरी एवढी जंगी उडी मारायला आपली नाहीं बुवा तयारी! माझं आपलं असं आहे—

**गजानन**—वाः ! हें काय बोलणं झालं ? पराक्रमाशिवाय प्रेमाची प्राप्ति थोडीच होत असते? आपली तर तुला सल्ला आहे. या पराक्रमाला तूं तयार व्हावंस ! अरे, जगांत कर्ता सुधारक म्हणून, हीरो म्हणून नांव मिळण्याची संधि—मधुकरानं मूर्खपणानं गमावलेली संधि—तुझ्याकडे चालत आली असतां अशी लाथाडतोस ? शेम !

**यशवंत**—गजाभाऊ, तुम्हीं कांहीं म्हणा पण माझं आपलं असं आहे!

**गजानन**—कांहीं समजतं तुला ? अरे, या विवाहाला तयार झालास, तर केवढं नांव होईल कांहीं कल्पना ? अरे, 'अभिनंदनीय आदर्श विवाह' या मथळ्याखालीं किती वर्तमानपत्रांतून तुमच्या स्तुतीपर लेख येतील, किती नियतकालिकांतून तुम्हां उभयतांचे सुंदर फोटो येतील. तुमच्या विवाहसमारंभाला रावसाहेब, रावबहादूर, प्रोफेसर्स, श्रीमंत शेट, इनामदार जहागिरदार, संस्थानिक वगैरे बडेबडे लोक पानसुपारीकरतां आणि तुमचं दोघांचं अभीष्टचिंतन करण्याकरतां उपस्थित होतील. आणि हां हां म्हणतां आपल्या ह्या पुण्यांतच म्हणूं नकोस, महाराष्ट्रांत म्हणूं नकोस तर सगळ्या हिंदुस्थानांत तुझी कर्ता सुधारक म्हणून प्रसिद्धी होऊन जाईल. हें कल्पनाचित्र डोळ्यापुढें आण आणि प्रसिद्ध होण्याचा, हा सुप्रसंग हातचा घालवूं नकोस.

**यशवंत**—छेः ! मला ती प्रसिद्धी नको आणि तें हिरो होणंही नको !

**गजानन**—अरे ! ऐन वेळीं भित्र्या उत्तराप्रमाणें असे हातपाय काय गाळतोस ? अर्जुनाप्रमाणें ऐन प्रसंगीं तुला व्यामोह कसा उत्पन्न होतो ?

**यशवंत**—तें काय पाहिजे तें म्हणा ! नालायक, नादान, नामर्द म्हणा. पण आहे हें असं आहे. कमलबद्दल मी फार तर सहानुभूति व्यक्त करीन. तिच्या अनुरूप स्थळ शोधण्याची मी खटपट करीन ! पण—

**गजानन**—अरे वाः रे उंटावरून शेळ्या हांकणाऱ्या शूरा! आतां कमल बाहेर आली आणि पूर्व संकेताप्रमाणें तिनें स्पष्ट सवाल केला तर तिच्यापुढं काय मग असं शेंपूट घालून बसणार? अशानं कधीं जगाची सुधारणा होत नसते समजलास? तें कांहीं नाहीं, तुला हीरो झालंच पाहिजे आणि तेवढं आपण करणार! आतां कमल बाहेर आली म्हणजे तिला तिच्या आई देखत, तुझ्याऐवजीं, तुझ्या वतीनं मीच सांगून टाकतों—

**यशवंत**—काय? काय सांगणार?

**गजानन**—सांगणार कीं आमचा हा—पण तें आत्तांच कशाला? काय सांगेन तें समक्षच ऐक म्हणजे झालं.

**यशवंत**—हें पहा, माफ करा बुवा; आपली अगदीं शरण चिठ्ठी! नाहीं तर मला मधीं घालून तुम्हीं आपलं भलतंच कांहीं तरी सांगाल आणि आल्याच या– ( कमल व तुळसाबाई चहा फराळाचें वगैरे घेऊन येतात.)

**तुळसा**—जरा उशीर झाला नाहीं! स्टोव्हच बिघडला मध्यें ह्मणून उशीर झाला! बरं घ्या. हा आमच्या बेळगांवकडचा मेवा बरं का? कसा काय आपल्याला आवडतो बघू या. ( सर्वांचे चहापान होतें. कमल मधून मधून यशवंताकडे पहाते. दोघांची दृष्टादृष्ट झाली कीं चटकन दोघेही दुसरीकडे पहातात. ) कमा, मी आतां तिकडे जाऊन येतें हं! ( गजाननरावांस ) आपण बसा. बेळगांवच्या मैत्रिणी माझ्याबरोबर आल्या आहेत. त्या आज मुंबईला जाणार आहेत, मला जरा त्यांच्याकडे जाऊन यायचं आहे. बसतां ना आपण!

**गजानन**—आहोंत थोडा वेळ. तुमचा मुक्काम आठ दिवस तरी आहे ना? ह्मणजे कमाच्या मैत्रिणीला एकदां भेटायला पाठवून देईन. म्हणजे मग तुम्हांला आमच्याकडे केव्हांही येतां येईल. नाहीं ग कमा?

**तुळसा**—येईन कीं! न यायला काय झालं? कमाच्या मैत्रिणीला भेटल्याखेरीज मी कशी जाईन! ( जाते. )

**गजानन**—कमाताई, गेल्या तीन दिवसांतली सारी हकीकत तुझ्या आईनं सांगितली मला. एकंदरींत मधुकरानं तुझ्या बाबतींत असं करायला नको होतं. त्यानं तुला चांगलाच त्रास दिला.

**कमल**—ते कशाला देतील ? माझ्या कमनशीबानंच मला त्रास दिला.

**गजानन**—बाकी हें खरें कीं,जस मधुकरानें तुला ऐन वेळीं फसवलं, तसं यशवंताच्या हातून मात्र—

**कमल**—पण त्यांच्या बाबतींत माझीच थोडी चूक झाली आहे. मी त्यांना भेटेन म्हणून कबूल केलं होतं पण—

**गजानन**—तेंच सांगतों ना. तूं त्याच वेळीं भेटली असतीस तर ! त्याच्या हातून चूक होणं शक्य होतं, असं अजून तुला वाटतं का ? मधुकर आणि यशवंत यांच्यांत हाच मुख्य भेद आहे. तुझी परिस्थिति कांहीं एक माहिती नसतांना मधुकरानें लहरी खातर तुला तोंडघशीं पाडलें असेल. पण अशी तुझी समक्ष परिस्थिति पाहून आणि समजून घेऊनही यशवंतानें तुझ्या बाबतींत न्याय्यच वर्तन—

**कमल**—त्याची मला पूर्ण कल्पना आहे. पण असं असूनही मला त्यांना अनुमति देतां आली नाहीं याबद्दल फार वाईट वाटतं. त्यांची कशी क्षमा मागावी हेंच मला कळत नाहीं. आतां—

**गजानन**—आतां मात्र कमल, तुझ्या बाबतींत, यशवंताचा पूर्ण—

**कमल**—काय ! माझ्या बाबतींत निश्चय झाला आहे !

**गजानन**—नव्हे, त्याचा पूर्ण नाइलाज झाला आहे. परवा, काल, निदान आज सकाळपर्यंत जरी तुझ्याकडून सर्व हकीकत कळली असती, तरी तो तुझा स्वीकार करण्याकरतां धांवत आला असतां. पण आतां काय उपयोग ? आज सकाळीं यशवंताच्या लग्नाचं निश्चित झालं ! हं : ! मग काय सांगतों तर ? म्हणून त्याचा नाइलाज झाला आहे !

**कमल**—काय ! यांच्या लग्नाचं दुसरीकडे ठरलं ? कुठें ? ( आवंढा गिळून हुंदका आवरीत खालीं पहात ) बरं तर ! ठरलं ! चांगलं झालं !

**गजानन**—म्हणजे त्याचं असं झालं. काल याचे वडीलमातुःश्री वगैरे मंडळी आली. त्यांनीं मुलगी पाहिली. पसंत केली आणि ठरवून टाकलं. हा नकार देणार होता. पण तुझ्याकडून कांहींच कळलं नाहीं म्हणून त्याला मुकाट्यानं संमती द्यावी लागली ! असं झालं तें ! ( कमल कांहींच न बोलतां दुःखी मुद्रा करून बसते.) म्हणजे असं झालं पहा. इकडे

मधुकरानं तुझ्या बाबतींत आपलं विधिलिखित अपयशीं केलं. तिकडे यशवंताचा असा निरुपाय झाला. काय करायचं ? योगायोग ! याला वधु कोण ठरली कळलं का तुला? आमच्या इथें आली आहे ती? तूं पाहिली आहेस ना ! आमच्या हणमुकाकांची मैनाताई ! ती मैनाताईच याची वधु ठरली !

**कमल**—(उत्तेजीत होऊन) काय ? काय सांगितलंत ? मैनाताईशीं यांचं लग्न ठरलं ? म्हणजे सांगतां काय ? होय यशवंत ?

**यशवंत**—अक्षरशः गोष्ट खरी आहे. पण या आपत्तीची जाणीव पूर्वी होती आणि मीं कळविलीही होती.

**कमल**—पण मी ऐकलं कीं, मैनाताईशीं त्यांचं कायम झालं म्हणून !

**गजानन**—त्यांचं कुणाचं ? हं. हं. मधुकराचं का ? चाललं होतं खरं. पण त्यानं ऐनवेळीं नकार दिला ना हणमुकाकांना ! त्यानं स्वच्छ सांगितलं कीं, मी प्रीतिविवाहाचा चहाता आहें आणि तसा प्रीतिविवाह पूर्वीच ठरलेला आहे. तेव्हां त्यांत मला बदल करतां येणें शक्य नाहीं !

**कमल**—होय ! खरं सांगतां ? पण मग त्यांची हृदयदेवता कोण ?

**गजानन**—तूं तर नव्हेस ? पण तूं तर म्हणतेस त्यानं तुला फसवलं!

**कमल**—काय दुदैंव एखाद्याचा छळ करीत असतं तरी !

**गजानन**—तुझ्याबद्दल कमल, मला फार वाईट वाटतं ! काय करूं ? माझ्या जर हातीं असतं आणि तुझी इच्छा असती, आणि मधुसारखाच दुसरा एखादा मुलगा माझ्या नजरेसमोर असतां तर आत्तांच त्याच्याशीं तुझं लग्न लावून मी मोकळा झालों असतों आणि मधूचा सूड घेतला असतां ! खरंच, मधुकरानं अशा रीतीनं तुझा गळा कापला, तर आतां पुढें तूं काय करणार आहेस !

**कमल**—कां बरं ! मी अशी हताश होणार नाहीं. वाटत होतं कीं लग्न करून घेऊन संसारसुख अनुभवावं. पण परमेश्वराची तशी इच्छा दिसत नाहीं ! ठीक आहे. मी एखाद्या नाटक कंपनींत जाईन, नाहींतर एखाद्या फिल्म कंपनीचा आश्रय करीन. नांव मिळवीन, कीर्ती मिळवीन.

**गजानन**—व्हेरी नाईस! कमाताई, कल्पना आपल्याला पसंत आहे !

**यशवंत**—काय ! तो मार्ग तूं पत्करणार कमल !

**गजानन**—मग काय तुला वाटलं ? खुळया प्रेमाचे वेडे चोज पुरवले गेले नाहींत, म्हणून मुळूमुळू रडायला आणि मिळेल त्याच्याशीं लग्न करायला तयार व्हायला काय ती तुमच्यासारखी पुरुष आहे ?

**यशवंत**—बरं आहे कमल, येतो ! तुझ्याबद्दल—

**गजानन**—काय ? तिच्याबद्दल काय ? तिच्याबद्दल कांहीं बोलायला नको. ती स्वतःला सावरून धरायला तुमच्यापेक्षां खंबीर आहे. कमा, हाच धडा तुला सुखाचा मार्ग दाखवील. ध्यानांत ठेव या महाब्राह्मणाचं वाक्य! ( दोघे जातात. दारापर्यंत कमल त्यांना पोंचवून येते व मग बेचैन होते.)

**कमल**—

**कशी ही पातली यामिनी । लुप्त चांदणि अंबरिं झाली । संचित सारोनी ॥ ध्रु० ॥ घाव घातला कसा कटू हा । वाचुं कशी साहोनी ? ॥ १ ॥**

( पद म्हटल्यानंतर मन अनावर होऊन दोन्हीं हातांनीं तोंड झांकून रडूं लागते. दुसऱ्या बाजूनें मधुकर येतो. त्याची चाहूल ऐकून व तोच असल्याबद्दल खात्री करून घेऊन त्याचेकडे न पहातांच ) कोण आहे ?

**मधुकर**—कृतकर्माबद्दल उपरती झाली आहे असा एक अनाथ प्राणी !

**कमल**—अरेरे दुर्दैवी ! एकादशीपाशीं शिवरात्र गेली अशीच गोष्ट झाली. बरं पण अनाथ प्राणी इथें कशाकरतां ?

**मधुकर**—आराधनेसाठीं !

**कमल**—आराधना ? कुणाची ?

**मधुकर**—प्रेमाच्या प्रतिमेची-नव्हे प्रत्यक्ष मूर्तीची !

**कमल**—असं ! मग आहे कुठें ती मूर्ती ?

**मधुकर**—माझ्यासमोर खुर्चीवर बसली आहे !

**कमल**—( उठून ) मी ? मी तर निष्ठुर, दुष्ट, खट्याळ, कपटी—

**मधुकर**—असं म्हटल्याचं प्रायश्चित मला चांगलंच मिळालं आहे.

**कमल**—पण म्हटलं आहे तें खोटं कुठं आहे? मी निष्ठुर आहें, खट्याळ आहें आणि कपटीही आहें. मी आपल्याला काय थोडा त्रास दिला आहे ?

**मधुकर**—आणि मी ? मी काय कमी कठोर आहें ? मी कुठें स्वार्थी

नाहीं ! आणि मी काय तुला त्रास कमी दिला आहे ? त्या सर्व पापांचं परिमार्जन व्हावं ह्मणून देवीच्या दारीं धरणं धरण्याकरतां आलों आहे ना !

**कमल**—पण इथें धरणं धरून उपयोग काय ?

**मधुकर**—कमलची प्राप्ति !

**कमल**—ती कशी होणार ?

**मधुकर**—कशी होत नाहीं, तेंच पहाणार आहें. ती होईपर्यंत या दारीं प्रायोपवेशन करण्याचा माझा निर्धार झाला आहे !

**कमल**—काय ! माझ्या दारीं बसून प्रायोपवेशन करणार ? अन् अशानं मैनाताई काय ह्मणेल ?

**मधुकर**—तिनेंच हा दिव्य मार्ग दाखवून दिला आहे. तिच्या मुळेंच माझे डोळे चांगले उघडले आहेत. आतां अगदीं स्वच्छ दिसूं लागलं आणि ह्मणूनच कमलनं भररस्त्यावर झिडकारल्यानंतरही पुन्हां कमलकडेच आलों! कमल, सांग, तुझ्या प्रेमाची आशा अजूनही नाहींच का ?

**आग लागे मना। होति या यातना॥ ध्रु०॥ विफलाश। मन खास। दावि आशा-खुणा। नाहीं तरी जाण। हा निराधार॥ १॥**

**कमल**—आपल्या प्रेमाची निराशा मला अजून छळते त्याची वाट काय!

**मधुकर**—कमल, कमा, हें काय ! रडतेस का अशी ?

**कमल**—कां बरं ! तेवढेंच माझ्या स्वाधीन आहे. रडायचं तरी अजून माझ्या भाग्यांत आहे कां नाहीं हें बघतें. पण मी रडलें, रुसलें, रागावलें तरी माझी कदर या जगांत कुणाला आहे ?

**मधुकर**—असं कां म्हणतेस ? तूं फिरून धिःकार करणार नाहींस, तर तुझे अश्रु पुसायला, रुसलीस तर समजावायला आणि रागावलीस तर राग काढायला माझ्या कमलचा हा मधुकर तुझ्यापुढें उभा आहें ना ! हें पहा त्याचं प्रत्यक्ष प्रत्यंतर ! ( तिचा हात धरतो. )

**कमल**—हें काय ! असं काय तें ! व्हा दूर. अशानं मी—

**मधुकर**—हं कितीही रागाव, संताप. हूं कीं चूं केलं तर विचार ! हात सोडला तर बोल लाव. हं. रुस ना ! रागाव ना ! रड ना !

**कमल**—हवं होतं तें मिळाल्यावर आतां का रडेन ? रुसेन ? रागावेन?

**कर करिं असा घेतां। मनीं मुदीता कांता । आतां ॥**
**कुठला, कसला, रुसवा। पळाला माझा। आतां ॥ ध्रु० ॥**
**कटु वच बोलुं कुणा, मी । आतां ? । हृदय मला हें देतां ॥**
**खुलतां, हंसतां, सगळा अबोला गेला । आतां ॥ १ ॥**

पण हें पहा, आतां हा धरलेला हात—

**मधुकर**—उद्यांच्या सुमुहुर्तावर आपल्या मस्तकावर शास्त्रोक्त अक्षता उधळून घेण्याकरितांच मी हात धरला आहे. नाहीं तर आणखी एकादा प्रतिस्पर्धी यशवंत मध्येंच उपटायचा ना मला ?

**कमल**—नाहीं तर दुसरे कुणी हणमुकाका आपल्या मैनाताईला घेऊन आपलं घोडं मध्येंच घालायचें !

**मधुकर**—त्याकरतांच म्हणतों कीं आतां जितक्या लवकर आपलं—

**सरस्वती**—( प्रवेश करून ) शुभमंगल सावधान ! होईल तितक्या लवकर झालं म्हणजे बरं ना ? (दोघे दचकून पहातात व हंसतात) वाः ग, कमाताई, तूं तर आजारी होतीस म्हणून कळलं होत मला !

**कमल**—होयच मुळीं !

**मधुकर**—म्हणूनच नाडी पहाण्याकरतां हातांत हात घेतला आहे.

**सरस्वती**—असं का ? अहो, पण तुम्ही वकील ना ? डॉक्टरी विद्याही अवगत आहे का तुम्हांला ? आतां कशी काय पेशंटची प्रकृति ?

**मधुकर**—आतां बराच आराम आहे; उद्यां या वेळपर्यंत मात्र—

**सरस्वती**—शुभमंगल होऊन गेलं म्हणजे साफ बरं वाटेल म्हणतां ?

**मधुकर**—( कमलकडे पहात हंसत हंसत ) हो ! जवळ जवळ तसंच.

**सरस्वती**—पण हे नाडी पाहून का तोंड पाहून ?

**मधुकर**—बरं वहिनी, तुमच्या मंगलभुवनांत उद्यांच्या मुहुर्तावर हा शास्त्रोक्तविधी उरकायचा म्हटलं तर—

**सरस्वती**—उद्यांच कसं होणार ? मैनावन्संच्या लग्नाच्या वऱ्हाड्यांनीं घरांत कोण गर्दी केली आहे. आमच्याकडे व्हायचं तर दोन दिवस तुम्हांला थांबलं पाहिजे.

**मधुकर**—कशाला ! गांवांत ब्राह्मणकार्यालयं आहेत. आणखी सार्वजनिक देवालयं आहेत ! पण मी म्हणतों इतकं तरी कशाला ! आम्हीं पट्‌दिशीं आळंदीलाच जाऊन लग्न लावून चट्‌दिशीं परत येतों. तिथें सगळी व्यवस्था थोडक्यांत असते ! आतां वहिनींच्या घरीं जायचं तें लग्नगांठ बांधूनच जायचं ! कां वहिनी !

**सरस्वती**—आळंदीला लग्न लावून या आणि आमच्याकडे प्रयोजन होऊं द्या म्हणजे झालं !

**मधुकर**—सूचना मंजूर ! कमळ, ठरलं. आजच आपण संध्याकाळीं आळंदीला कूच करूं या. तूं तयारींत ऐस. मी पण जाऊन येतों ! बरं वहिनी, तुमचा आशिर्वाद असूं द्या.

**सरस्वती**—लग्नगांठ बांधून पायां पडायला या, मग आशिर्वाद. (जातात)

---

## प्रवेश तिसरा

(**गजाननरावांचें घरापुढील रस्ता**-गंगासानी, तुळसाबाई व सदू गडी)

**तुळसा**—( समोरून पहात येणाऱ्या गंगासानीस थांबवून ) काय हो, सरूताई देवांचं घर कोणतं हें तुम्हांला माहीत आहे का हो ?

**गंगासानी**—काय जणं ! मी देखील आपल्या सारखीच गजाननराव साहेबांचं घर शोधतें आहें. या पुण्याला कांहीं म्हणतां कांहीं कळत नाहीं. एका घराच्या पुढच्या दरवाजाला एका पेठेचं नांव आणि एक नंबर तर मागच्या दिंडीला दुसरीच पेठ आणि तिसराच नंबर दिसतो ! माणसानं शोधायचं तरी कुठवर ?

**तुळसा**—तुम्हीं पण आमच्यासारख्या परठिकाणच्याच आहांत वाटतं ?

**गंगासानी**—हो, मी तिकडली सावंतवाडी संस्थानांतली रहाणारी आहें. माझा मुलगा इथें असतो. त्याचे एक गजाननरावसाहेब म्हणून स्नेही आहेत. त्यांच्याकडे जातो म्हणून गेला त्याला दोन दिवस झाले. अजून परत आला नाहीं म्हणून शोधाकरतां मी निघालें आहे. अन् तुम्हीं—

**तुळसा**—मी बेळगांवची आहें. माझी मुलगी इथं आहे. दोन दिवस झाले ती आपल्या एका मैत्रीणीकडे कांहीं कार्य आहे म्हणून गेली आहे. त्यांचं नांव सरूताई. त्यांच्या घराच्या शोधांत आहें मी. पण तें घर कांहीं सांपडत नाहीं. विचारावं तरी कुणाला आतां ? विचारलं तरी कुणी सांगतं तरी कां नीट ? फाजील पुण्याचे लोक कांहीं तरीच सांगतात !

**गंगासानी**—कुणी कुणी तर ऐकतच नाहींत. विचारलं तरी तस्से पुढें चालते होतात. ( कांहीं सामान घेऊन सदू गडी बाहेरून येतो त्यास ) थांबतां कां जरासें ! हें पहा ! या घराचे मालक कोण आहेत ?

**सदू**—या घराचे मालक ? माझे धनी !

**गंगासानी**—तुमचे धनी म्हणजे ?

**सदू**—म्हणजे या घराचे मालक !

**गंगासानी**—तें खरं; पण त्यांचं नांव काय ?

**सदू**—मालकांचं नांव भाऊराव ! कां बरं ?

**गंगासानी**—अस्सं का ? गजाननरावसाहेबांचं हें घर नव्हे तर ?

**सदू**—साहेबाचं घर ? ह्ये नव्ह बा ! तुम्हांस्नी साहेब व्होवती ! अन् त्ये कशापायी ?

**गंगासानी**—साहेबांच्याकडे मुलाबद्दल—

**सदू**—तुमचं प्वार चुकलया जनू ? मगं जावा कीं नीट फरासखान्यांत. ततं साहेब भेटत्याल. मंग त्येंच घरच कशाला व्होवं ?

**गंगासानी**—( हंसून तुळसाबाईस ) यांची भलतीच समजूत झाली.

**तुळसा**—सरूताई, सरूताई म्हणून कुणी बाई इथेंच जवळपास रहातात-त्यांचं घर तरी तुम्हांला सांगतां येईल का ?

**सदू**—छेऽबा ! आमच्या ह्या आळीला घरवाली बाई कुणी न्हाइच. तुम्हास्नी कुठला पत्ता सांगितलाया ?

**तुळसा**—सांगतं कोण ? घरांत पत्ता टिपला आहे त्याच्यावरून शोध करावयाचा. आतां बाई हे पत्ते शोधून तरी कसे काढायचे ?

**सदू**—तुम्हांस्नी घर व्होवं, त्येची एकादी खून तरी ठावं हाय ?

**तुळसा**—त्या घरांत लगीन आहे पहा.

**सदू**—हात्येच्या ! आमच्या घरांतबी लगीन हाय ! संमद्या पुन्यांत घरोघर लगीनं हायती. घराघराला तोरनं लागल्याती. घराघरा म्होरं ताशे-वाजंत्री वाजत्याती. त्येचा काय उपेग तुम्हांस्नी ? बरं, मी आतां येक युगत सांगतूं ! ह्ये बघा उद्यां सकाळीं उठूनशान मंडईत जावा. ततं खिन-भर उभ्या ऱ्हा. तुम्हांस्नी होवं असणार साह्येब, बाईसाहेब मंडई कराया जात्याल तवा आपसुकच त्येंची तुमची भेट बी व्हईल अन् मंग त्येंच घर बी गवसल. बरं जातु मी ! लई वखुत झालाया. मालक काढत्याल खराडपट्टी. ( घरांत जाऊं लागतो. )

**गजानन**—(घाईघाईनें येत)अरे सदू, होतास कुठें इतका वेळ? जिकडे जातां तिकडेच कसे नाहींसे होता रे ? चुकार लेकाचे ! घाईच्या वेळीं तर तुम्हीं लोक हटकून असा चावटपणा करतां. घरांत लग्नघाई आहे, दरघडीं हांकेला हजर असलं पाहिजे, ठाऊक नाहीं तुला ? कुठें गेला होतास ? वत्त्या सांगायला ना ? आणि त्याला इतका उशीर ? जा अगोदर आंत. पुन्हां चुकारपणा करशील तर खबरदार !

**तुळसा**—अगबाई, हे तर— ( गजाननरावांचें लक्ष जाते. )

**गजानन**—अरे ! तुम्हीं ? आत्तां आलांत का ? अरे सदू , ए सदू , हें पहा, यांना घरांत मंडळीकडे नेऊन पोचीव. क्षमा करा हं. घरीं मित्राच्या लग्नाच्या घाईत होतों. पुन्हां तुमची चौकशी करावयाला वेळच झाला नाहीं. तुम्हीं आपण होऊन आलांत, फार बरं वाटलं. तुम्हीं मंडळींना भेटा तोंपर्यंत मी बाहेरून काम उरकून आलोंच !

**तुळसा**—हेंच कां आपलं घर ? बरं झालं बाई ! काय चमत्कार—

**गजानन**—बरं, चलतांना आंत ?

**तुळसा**—चलतें मी ! पण—( गंगासानीकडे पहाते. ) तुमच्याबद्दल यांनाच विचारूं या. यांना एका घराचा पत्ता हवा आहे.

**गजानन**—कुणाकडे जायचं आहे यांना ? या—

**तुळसा**—या मूळच्या तिकडच्या सावंतवाडी संस्थानांतल्या आहेत ! यांना—कुणाचं घर हवं आहे हो ?

**गंगासानी**—मला गजाननरावसाहेबांचं घर हवं आहे !

**गजानन**—गजाननरावसाहेब ! कोण ! त्यांचं आडनांव काय ! तुम्ही सावंतवाडीच्या ना !

**गंगासानी**—हो. मी तिकडची. इथेंच कुठें गजाननरावसाहेब म्हणून रहातात. त्यांचं आडनांव मला माहीत नाहीं. पण माझा मुलगा मधुकर, याचा त्यांचा स्नेह आहे आणि तो त्यांचेकडे गेला आहे म्हणून—

**गजानन**—मधुकर म्हणजे ! तो देवधरच का ! वकील आहे तो !

**गंगासानी**—हो, हो, तोच ! तोच !

**गजानन**—असं ! म्हणजे आमच्या मधुकराच्या मातुःश्री का आपण ! वाः ! मीच तो गजाननराव. माझंच घर हें. आकस्मिक तुमची भेट झाली. अरे सदू, त्यांच्याबरोबर यांनाही घरांत मंडळीकडे घेऊन जा. हं ! तुमचा हा एक अलभ्य लाभच झाला म्हणावयाचा ! ( तुळसाबाईस ) आपली माहिती आमच्या मंडळींना आहेच. आपण यांचा मधुकराच्या मातुःश्री म्हणून परिचय करून द्या म्हणजे यांचीही ओळख पटेल. बरं चला हं. ( जातो. )

**गंगासानी**—म्हणजे आपण दोघींही एकाच घरीं जाणार म्हणायच्या! काय तरी बाई एकेक चमत्कार होतात तरी !

**सदू**—चलतांना मग आंत. लगीनघरांत गेल्यावर होवं तिक्तं चमत्कार दिसत्याल ! चला बिगीबिगी. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश चौथा

( **गजाननरावांचें घर**-मैनाताई-यशवंत हे नूतन जोडपें पदराला लग्नगांठीं बांधून जात आहे; सरस्वती येते. आंत मंगलवाद्यें वाजत आहेत. )

**सरस्वती**—हें काय ! यशवंत, तुमच्या झाल्या म्हणून आमच्या मैनावन्संना अशा ओढतां काय ! त्यांची तारांबळ नाहीं कां होत !

**मैना**—पण मी काय म्हणून तारांबळ करून घेईन उगीचच्या उगीच! मी कुणाच्या ओढाताणीनं ओढाताण होऊंही द्यायची नाहीं आणि कुणाच्या चालीनं चालायचीही नाहीं. ऐकलंस कां वहिनी, माझ्या चालीनंच इतरांना चालविणारी आहे म्हटलं मी !

**सरस्वती**—ऐकलंत यशवंत, मैनावन्सं काय म्हणत आहेत त्या ?

**यशवंत**—ऐकण्यापेक्षां प्रत्यक्ष अनुभवच घेतों आहें वहिनी मी ! बरं, वहिनी, नमस्कार करतों. (नमस्कार करतो.)

**मैना**—मी पण वहिनी नमस्कार करत्यें. (नमस्कार करते.)

**सरस्वती**—इश्श ! मला कशाला नमस्कार करायचा ?

**यशवंत**—तुम्हीं आम्हांला थोर म्हणून, आमच्याकरतां कष्ट केले, करतां म्हणून !

**मैना**—वहिनी, आमच्या चांगल्याकरतां कष्ट करायचे हें तुमचं कर्तव्यंच होतं आणि आहे. त्याकरतां नाहीं हं मी नमस्कार केला. मी आपला तुमचा आशिर्वाद मिळावा म्हणून नमस्कार केला.

**सरस्वती**—पण देवाला नमस्कार केला का ? देवाआधीं मला नमस्कार कशाला ?

**यशवंत**—तुम्हींच आमचे चालते बोलते देव आहांत !

**मैना**—आतां मुकाट्यानं चांगला आशिर्वाद द्या म्हणजे झालं !

**सरस्वती**—औक्षवंत व्हा !

**मैना**—नुसतंच औक्षवंत होऊन काय करायचं ?

**सरस्वती**—अष्टपुत्रासौभाग्यवती व्हा !

**मैना**—इश्श ! यापेक्षां नवा आशीर्वाद देतां नसतां कां आला ?

**सरस्वती**—वन्स, यापेक्षां चांगला आशिर्वाद तो काय द्यायचा ?

**मैना**—तुम्हीं नव्या चालीच्या आहांत, तेव्हां नव्या चालीला धरून कांहीं उपयुक्त आशिर्वाद द्या—

**शांत दांत आनंद आतां जगीं या । जाई पळोनि खेद । आयु न वांया ॥ ध्रु० ॥ शुभ आला दिवस खास ! केलित ही पुरति आस । असु दे नित हीच माया ॥ १ ॥**

**सरस्वती**—वाः वन्स ! बऱ्याच कीं तुम्हीं तरी आहांत हो ! यशवंत, तुम्हांला कसं वाटतं ?

**यशवंत**—मला वाटतं वहिनी, आम्हीं प्रेमानें जन्मभर नांदावें असा एकच साधा, सुटसुटीत, सरळ आणि अर्थपूर्ण आशिर्वाद द्या म्हणजे झालं !

**सरस्वती**—म्हणजे आज मैनावन्संवर तुमचं प्रेम नसलं तर माझ्या आशिर्वादानें उत्पन्न होईल वाटतं ?

**यशवंत**—वाः वहिनी !

**सरस्वती**—खोटं बोललें कां मी ? मैनावन्स, आजच सांगून ठेवतें बरं का, यशवंतांचें प्रेम तुमच्यावर नव्हतं.

**मैना**—त्याची तूं काळजीच करूं नकोस वहिनी ! तूं आपला आशिर्वाद दे कशी ! आम्हीं प्रेमानें नांदतों कीं नाहीं हें पहा तरी !

**सदु**—बाईसाब, कोन दोन बाया आल्याती ! तुम्हास्नी बघत्याती !

**सरस्वती**—माझ्याकडे ? चल, आलेंच ! यशवंत, मैनावन्स, जातांना सर्वांना नमस्कार करावयाला ! ( मैना यशवंत एकीकडे व सदू सरस्वती दुसरीकडे जातात. तिसऱ्या दारानें गजाननराव व मधुकर कमल येतात.)

**गजानन**—अरे वाः ! एकूण आम्हांला न कळवितां तुम्ही चतुर्भुज झालांत म्हणायचं !

**कमल**—आपल्याला ठाऊक नसलं तरी सरूताईला माहित होतं सारं.

**मधुकर**—आम्हीं आमचें विवाहमांगल्य श्रीक्षेत्र आळंदी मुक्कामीं शास्त्रोक्तरीतीनें घडवून आलों !

**गजानन**—काय ? आळंदीस ? आणि आत्तां काय आळंदीहून आला ? अरेच्या ! पण आळंदीच कां पसंत केलीत ?

**मधुकर**—अहो, तुमच्या इथें लग्नाची गडबड होती आणि आम्हांला तर गडबडीनें लग्न उरकून घ्यायचं होतं म्हणून !

**गजानन**—ठीक आहे ! बरं, आतां अगोदर तुम्हां उभयतांच मला अंतःकरणपूर्वक अभीष्ट चिंतू द्या. मधू, तुझ्या मनाप्रमाणें झालं ? कमाताई, तुझी इच्छा फलद्रूप झाली ! ही तुमच्यावर ईश्वराची कृपाच समजा ! हे जे विधिघटनेप्रमाणें मंगल शरीरसंबंध जुळून येत असतात त्याला कारण—

**कमल**—या विघ्नहर्त्या गजाननाची कृपा असंच मी समजतें !

**गजानन**—असं का ? बरं, तसं समज ! पण हेंच ध्यानांत ठेऊन भावी आयुष्यांत–

**हणमंतराव**—( आंतून ) गजानना, अरे गजाभाऊ, आहेस कुठें तूं ?

अरे गेला कुठें हा ! ( प्रवेश करून) गजाभाऊ, तिकडे पाहुणे वाट पहात आहेत आणि इथें तूं काय करीत आहेस ? आणि हे कोण ? मधुकर ?

**गजानन**—हणमुकाका ! हा मधुकर चतुर्भुज होऊन आला आहे. कालच याचं लग्न झालं. आपली अर्धांगी दाखवायला घेऊन आला आहे.

**हणमंतराव**—काय ! हे शिष्ठ चतुर्भुज झाले ! या शिकलेल्या सैतानानं कुणाला तरी दगा दिला खास ! तरी मी म्हणत होतों, असल्या संभावीत सोद्यांची गय करतां उपयोगाची नाहीं. यांची गाढवावरून चांगली धिंडच काढली पाहिजे. काय रे लफंग्या, कुणाच्या प्रतिष्ठितपणाचा प्राण घेतलास ? आं? कुणा भल्याच्या पोरीच्या गळ्याला गळफांस लावलास!

**गजानन**—हणमुकाका, हणमुकाका, हें काय ?

**मधुकर**—हणमुकाका, कां उगाच शिरा ताणतां ? तुमच्या मुलीचा मी स्वीकार केला नाहीं, म्हणून हा गहजब का ? आमचा हा प्रीतिविवाह झाला आहे ! प्रीतीविवाहाचे पुरस्कर्ते, या विसाव्या शतकांत, सुधारणेच्या सुवर्णयुगांत, शिक्षितांच्या साम्राज्यांत तुमच्या अर्थाडॉक्सी मतांना काडीची किंमत देतील असं कां तुम्हांला वाटतं ? तुमची पुराणीं मतं शिक्षितांच्या समाजांत त्याज्यच नव्हे पण हास्यस्पदही ठरतात.

**गजानन**—अरे पण मधू, अहो पण हणमुकाका आहे काय भांडण ?

**मधुकर**—तें त्यानाच विचार. प्रीतिवाहाचं महत्त्व, सुधारणांच तत्त्व,

**हणमंतराव**—ए सुधारकाच्या कांद्या, सुधारणेच्या गोष्टी कुणापुढें बोलतो आहेस ? सुधारणा करणारा अशी तुझ्यासारखी जात लपवीत असतो का ? माझ्याजवळ डाळ शिजली नाहीं, म्हणून या पोरीच्या आईबापांच्या प्रतिष्ठितपणावर दरोडा घातला आहेरू कीं नाहींस ?

**मधुकर**—अहो, आतां माझ्याशीं तुम्हांला काय कर्तव्य आहे ?

**हणमंतराव**—काय कर्तव्य आहे ? पुन्हां निर्लजासारखा प्रश्न विचारतोस ? (त्याचा हात जोरानें धरून) काय कर्तव्य आहे सांगतों हं तुला—

**गजानन**— हणमुकाका, पण मला सांगा—

**हणमंतराव**—( गजाननरावास ) चल हो बाजूला ! मला हा माझ कर्तव्य विचारतो ? त्याला चांगलं उत्तर देतों. ऐकलंस रे चोरा, या



मधुकर—कमल, बोल, अजूनही तुझ्या प्रेमाच्या प्राप्तीची आशा नाहींच का?

तुझ्या अर्धांगीला विचारतों, हिच्या आईबापांना जाऊन भेटतों आणि त्यांना विचारतों, या पाजी माणसानं तुम्हांला आपल्या जातगोताचा पत्ता लागू दिला होता का? जें काय झालं तें समजून उमजून झालं आहे का?

मधुकर—( संतापून ) गजाभाऊ, आतां माझ्या शांतपणाची सीमा सुटली! इतका वेळ तुमच्याकरतां, आणि यांच्या पांढऱ्या केसांचा मान ठेवावा म्हणून यांची वाटेल ती बडबड ऐकून घेतली. पण आतां हें फारच चेकाळले. आतां मी शांत रहाणें शक्य नाहीं. माझा अकारण अपमान, निष्कारण नालस्ती, मी काय म्हणून सहन करूं? माझ्या चारित्र्यावर शिंतोडे! मी याचा जाब मागितल्याखेरीज रहाणार नाहीं!

गंगासानी—(सरस्वती व तुळसाबाईसह प्रवेश करून) मधू, केव्हां आलास रे? आणि आलास तो असा कुणाशीं भांडायला काय लागलास?

मधुकर—कोण? आई! ( ओशाळून खालीं पहातो. )

कमल—कोण? आई! ( लाजून खाली पहाते. )

सरस्वती—( गंगासानीस) पाहिलीत, ही तुमची सूनबाई! कमाताई, आपल्या सासूबाईंना नमस्कार कर बरं!

गजानन—( तुळसाबाईस ) बाई, हा तुमचा जावई बरं का! मधुकर, पुढें होऊन त्यांना नमस्कार कर.

तुळसा—जांवई कसे फक्कड मिळाले हो! कमा, बरीच कीं ग आहेस! मला कांहींच कळविलं नव्हतंस तूं!

गंगासानी—सरुताई, तुम्हीं सांगितलं तें अगदीं खरं अं! सूनबाई पण सूनबाई! हजारांत अशी मिळायची नाहीं! मधू, तूं पण काय आहेस रे! ( गजाननराव हणमुकाकास बाजूस नेऊन त्यांच्या कानांत सांगतात.)

हणमंतराव—अरे लेकाच्यो! हें असं आहे का! रामकृष्णहरि! अरे गजू, तुम्हीं सगळेच मोठे बिलंदर आहांत कीं! हें मला पूर्वी माहित असतं तर मी रे कशाला अकारण इतका कंठशोष केला असतां? आणि मधुकरपंतानां तरी असं टाकून कशाला बोललों असतों!

गजानन—पण कांहीं तरी कारणावरून लग्नांत खुसपट निघून एकदां भांडणानं मांडवशोभा व्हावीच लागते ना! ती शोभा आत्तां आली!

**सदू**—( यशवंत-मैनासह प्रवेश करून ) ह्ये बघा, हातच मालक बी हैती आन् हानमुकाका बी हैती, आन् समदी मानसं हैती नव्हं का!

**गजानन**—( यशवंतास ) या नवरदेव ! या तुम्हीं मैनाताई. तुम्हीं हणमुकाकांना नमस्कार करायला आलांत वाटतं ? हणमुकाका, ही दुकल तुम्हांला नमस्कार करून तुमचा शुभाशिर्वाद मिळवायला आली आहे !

**हणमंतराव**—रामकृष्णहरि ! अरे, आतां मी रे का यांना आशिर्वाद देणार नाहीं ? तोंडभर आशिर्वाद आहे माझा त्यांना ! आतां—

**यशवंत** व **मधुकर**—आतां तुम्हांला नमस्कार, देवा गजानना—

**गजानन**—पुनरागमनायच म्हणून आतां तुम्हीं आमचं विसर्जन करायला उत्सुक आहांत हें माझ्या लक्षांत आलं आहे ! आतां वडील मंडळींना नमस्कार करून झाले ना ? आतां तिकडे पाटावर बसायला चला कसे ? करा नमस्कार, घ्या आशिर्वाद ! कां हणमुकाका ? ( जोडपीं नमस्कार करतात. ) सर्वसौख्य प्राप्तिरस्तु.

**हणमंतराव**—तथास्तु !

**नित्य हाचि रम्यकाल । दावि यशाचा ॥ ध्रु०॥ पसरि जगीं या देवा ! तव प्रीतीच्या विभवा । कार्याच्या सुममाला । वाहुं मंगला ॥ १ ॥**

---



**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।
त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन ॥**